बालसंगीतबोध—पुस्तक पहिलें—किंमत ६ आणे.

बालसंगीतबोध—पुस्तक दुसरें—किंमत ८ आणे.

बालसंगीतबोध—पुस्तक तिसरें—किंमत १॥ रुपया.

---

संगीतबोध—पुस्तक पहिलें—छापत आहे.

---

हीं पुस्तकें 'गायनसमाजाचे सेक्रेटरी' व 'शिवाळकर आणि मंडळी' यांजकडे विकत मिळतील.

# प्रस्तावना.

बालसंगीतबोधाचें हें तिसरें पुस्तक होय. ह्यांतील विषय रचना व योजना पहिल्या व दुसऱ्या पुस्तकांप्रमाणेंच आहेत. ह्या पुस्तकांत प्रथम १ पासून १५ पाठापर्यंत रागांस व गीतांस उपयोगी पडणारे विशेष कठिण असे १५ अलंकार दिले आहेत. ह्यांतील कांहीं अलंकारांत मंद्र व तार सप्तकांतील स्वरांचीही योजना केली आहे. पुढें १६ व्या पाठापासून ४४ व्या पाठापर्यंत विद्याखात्यांतील मराठी क्रमिक पुस्तकांपैकीं पांचव्या व सहाव्या पुस्तकांत असलेल्या नमुनेवाईक सर्व कविता घेऊन त्यांस योग्य व अनुकूल असे निरनिराळे राग व ताल लावून दाखविले आहेत. ४५ व्या पाठापासून ५६ व्या पाठापर्यंत १२ पाठांत, क्रमानें प्रहर्षिणी, मत्तमयूरी, हरिणी, मंदाक्रांता, वियोगिनी, व शिखरिणी ह्या वृत्तांच्या कविता क्रमिक पुस्तकांत न आलेल्या मुद्दाम घेऊन त्यांतील प्रत्येक कविता अनुरूप अशा दोन दोन रागांत व तालांत बसवून दाखविली आहे. असें केल्यानें आतां तिन्ही पुस्तकें मिळून प्रसिद्ध कोणच्याही वृत्ताची मराठी कविता गायनांत बसवावयाची राहिली नाहीं.

एथपर्यंत वृत्तात्मक कवितांचे सर्व नमुने दाखविले. यापुढें प्रौढ गायनांत दृष्टोत्पत्तीस येत असलेले प्रबंधाचे निरनिराळे प्रकार बाल विद्यार्थ्यांना कळावे ह्या उद्देशानें मुद्दाम मुख्य अशा रागांत व तालांत प्रसिद्ध नायक व उस्ताद यांचीं दोन ध्रुवपदें, दोन ख्याल, दोन तराणे, दोन स्वरावर्ती, दोन प्रबंध, एक चतुरंग, दोन जयदेवकविकृत अष्टपद्या, कर्णाटकी एक गीत व तीन कीर्तनें लिहून दाखविलीं आहेत. ह्या योगानें त्यांना प्रौढ व सशास्त्र गायनाचा थोडासा तरी परिचय होईल अशी उमेद आहे.

ह्या पुस्तकांत गायनविचारापैकीं अवशिष्ट राहिलेला विषय जे राग त्यांचा उपोद्घातांत थोडक्यांत पण पूर्णतेनें व सर्व दिशांनीं विचार केला आहे. रागांस अतिशय उपयोगी पडणारा जो स्वरप्रस्तार त्याचें प्रथम सविस्तर वर्णन करून नष्टोद्दिष्ट समजण्याकरितां खंडमेरूची सोपपत्तिक रचना सांगितली आहे, व त्यावरून नष्ट व उद्दिष्ट प्रकार कसे काढावे हेंही उदाहरणासह स्पष्ट करून दाखविलें आहे. नंतर रागांचे शरीररूपी जे नानातऱ्हेचे स्वर त्यांविषयीं विशेष विचार केला आहे. एथें सप्तस्वरांचें सापेक्ष प्रमाण, त्यांच्या लहरींचें प्रमाण व हेच स्वर तंतुवाद्यांत ३६ इंचांची तार घेऊन तीवर काढले असतां त्यांमध्यें दिसून येणारें तारेचें सापेक्ष इंचाचें प्रमाण ह्या तीन प्रमाणांची तुलना करून महाराष्ट्र किंवा उत्तर हिंदुस्थान, कर्णाटक, व पाश्चिमात्य राष्ट्र ह्या तीन ठिकाणच्या प्रचारांतील मुख्य स्वरांमधील श्रुतींचीं व स्वरांचीं अंतरें देऊन व तारतम्य दाखवून त्यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न केला आहे. याच्यापुढें ओघानेंच विकृत स्वरांचा विचार प्राप्त झाला. ह्याविषयीं विचार करितांना निरनिराळ्या ग्रंथकारांनीं भिन्न भिन्न विकृत स्वर किती व कोणचे मानिले आहेत व त्यांचा असा मतभेद होण्याचें प्रयोजन काय ह्याचें फार सूक्ष्म रीतीनें सकारण व सोपपत्तिक वि-

वेचन केलें आहे. संगीतरत्नाकरकारापासून आजपर्यंत विकृत स्वरांच्या संबंधानें परिवर्तन कसकसें होत गेलें व आजच्या मितीला त्यांची स्थिति काय आहे हें एकसमयावच्छेदेंकरून एकत्र दाखविण्याकरितां शुद्ध व विकृत स्वरांचें संपूर्ण कोष्टक दिलें आहे, व पुढें ह्या कोष्टकांतील प्रत्येक रकाना घेऊन त्यावर विस्तारानें टीकात्मक विवेचन केलें आहे. ह्या विवेचनांत सर्व ग्रंथकारांचे मतभेद नमूद करून व त्यांतील ग्राह्याग्राह्यतेचा भाग ठरवून शेवटीं स्वसंमत ह्या सदराखालीं दिलेल्या स्वरांविषयीं लिहितांना आपल्यास शास्त्र व प्रचार ह्या दोहींसही धरून सध्यांच्या स्थितींत किती व कोणचे स्वर मानणें योग्य व इष्ट आहे, ह्याबद्दल शास्त्रीय दृष्टीनें साविस्तर व सोपपत्तिक ऊहापोह केला आहे, व अखेरीस सर्व प्रकारच्या गाण्यांचा संग्रह करण्याकरितां १८ स्वर त्यांच्या श्रुतींसह निश्चित केले आहेत.

एथपर्यंत स्वरांविषयीं सर्व दिशांनीं व सर्व प्रकारें विचार झाला. यापुढें रागांच्या जनक व मूलस्वरूपभूत ज्या जाति व गीति ह्यांचीं लक्षणें देऊन व त्यांचे विभाग सांगून थोडक्यांत त्यांचें स्वरूपही स्पष्ट करून दाखविलें आहे. ह्यांतच कपाल व कंबल ह्यांच्या स्वरूपाचेंही दिग्दर्शन केलें आहे. इतकी सामग्री तयार झाल्यानंतर एथून पुढें मेळ व राग ह्यांच्या विचारास सुरुवात केली आहे. प्रथम मेळांचें लक्षण देऊन मेळ व जाति ह्यांमधलि भेद स्पष्ट करून दाखविला आहे, व पुढें पारिजातकार व रागविबोधकार ह्यांच्या मतांप्रमाणें मेळांचे विभाग व संख्या सांगून रागविबोधकारानें दिलेले रागांवरून नांव पावणारे २३ मुख्य मेळ, त्यांचें स्वरात्मक स्वरूप, व त्यांच्यांत अंतर्भूत होणारे राग ह्यांसह कोष्टकरूपानें दाखविले आहेत. यापुढें भरतकल्पलतामंजरीच्या मताप्रमाणें कर्णाटकांत प्रसिद्ध असलेल्या मुख्य ७२ मेळांचें संपूर्ण कोष्टकही दिलें आहे. ह्यांत ६, ६ मेळांचें एक चक्र अशीं शुद्धमध्यममूलक ६ चक्रें व प्रतिमध्यममूलक ६ चक्रें मिळून १२ चक्रें मोठ्या कल्पकतेनें बसविलेलीं त्यांच्या विशिष्ट स्वरांसह योग्य रचना करून स्पष्ट दाखविलीं आहेत. ह्या मेळांच्या चक्रांवर टीका करितांना त्यांच्या रचनेचें तत्व सांगून मेळांच्या पहिल्या दोन अक्षरांवरून कटपय-मानानें मेळांचा क्रम व त्यांची स्वररचनाही कळावी अशी योजना किती चातुर्यानें केलेली आहे ह्याचें सोदाहरण स्पष्टीकरण केलें आहे.

ह्या पुस्तकाचा मुख्य विषय जे राग त्यांचें विवेचन एथून सुरू केलें आहे. प्रथम रागाचें पूर्णतेनें लक्षण देऊन तदनुषंगिक आलाप, आलप्ति, रूपक व आक्षिप्तिका यांचें थोडक्यांत स्वरूप दर्शविलें आहे. पुढें मार्गराग व देशीराग ह्यांचें स्वरूप सांगून त्यांचा भेदाभेद स्पष्ट करून दाखविला आहे. नंतर निरनिराळ्या ग्रंथकारांच्या मतांप्रमाणें रागांचे वर्गीकरण व संख्या व त्यांचे भेद, कसे व किती आहेत हें सांगून रत्नाकरकाराच्या मताप्रमाणें रागांचे १० प्रकार, त्यांची संख्या व त्या त्या प्रकारांतील प्रचारांत दृष्टोत्पत्तीस येणारे राग विशेष सूचनांसह कोष्टकरूपानें दिले आहेत. सध्या प्रचारांत असलेल्या देशी रागरागिण्यांचें व त्यांच्या कालनियमांचें मूळ शोधूं गेल्यास तें हनुमानाच्या मताला अनुसरून बहुतेक अर्वाचीन ग्रंथकारांनीं दिलेल्या मुख्य ६ पुरुषराग,



त्यांच्या भार्या व पुत्र ह्यांच्या वर्गीकरणांत सांपडतें, ह्मणून मुख्य ६ पुरुषराग, त्यांचें उत्पत्तिस्थान, त्यांच्या भार्या व पुत्र व ते गाण्याच्या वेळा, ऋतु व रस ह्या सर्व माहितीचें संपूर्ण कोष्टक दिलें आहे, व त्यांतील मतभेदही नमूद केला आहे. पुढें देशी रागांचें वर्गीकरण दोन प्रकारें सांगून राग गाण्याचे ५ प्रकार गीति ह्या सदराखालीं दिले आहेत. एथपर्यंत देशी रागांच्या संबंधानें सर्व प्रकारची शास्त्रीय सामान्य माहिती देऊन पुढें प्रचारांतील रागांचें सविस्तर कोष्टक दिलें आहे. ह्या कोष्टकांत मुख्यतः रागांचें स्वरात्मकस्वरूप, त्यांचे ग्रह, अंश व न्यास स्वर, गाण्याची वेळ व ते गाइल्यामुळें अभिव्यक्त होणारे रस भाव, व त्यांचे भेद, प्रकार व विशेष गोष्टी ह्या सर्व बहुमताला अनुसरून दिल्या आहेत. हें काम फार बिकट व भानगडीचें आहे, व ह्यांत मतभेद होण्याचा फार संभव आहे. निरनिराळ्या घराण्यांतून केवळ मुखपरंपरेनें शिकून तयार झालेले सध्याचे शास्त्रपराङ्मुख गवई प्रसंगविशेषीं दोन चार जर एकत्र झाले तर त्यांचा गाइलेल्या रागांच्या वर्ज्यावर्ज्याविषयीं व तीव्रकोमलाविषयीं मतभेद किंबहुना तंटा झाल्याशिवाय रहात नाहीं असा सार्वत्रिक अनुभव आहे. ह्याचें मुख्य कारण त्यांची प्रत्येकाची अहंमन्यता व शास्त्रीय माहितीचा अभाव हीं होत. अशी सध्याची गायनकलेची स्थिति असल्यामुळें रागांचे वर्ज्यावर्ज्य, तीव्र कोमल व अंश ग्रह न्यास वगैरे स्वर ह्यांच्या विषयीं मतभेद झाल्यास त्यांत नवल नाहीं. तथापि ह्या प्रकारच्या मतभेदाची एकवाक्यता शास्त्रीयदृष्ट्या कशी करावी ह्याचें ह्या कोष्टकावर टीकात्मक पांच सहा कलमें पुढें लिहिलीं आहेत त्यांत दिग्दर्शन केलें आहे, व रागांचें वर्गीकरण व प्रकार व त्यांच्या संज्ञा व गाण्याच्या वेळा ह्याविषयींच्या अनभिज्ञ लोकांच्या आक्षेपाचें यथामति निरसन केलें आहे. शेवटीं रागांच्या स्वरात्मक स्वरूपांवरून दिसून येणाऱ्या स्वरांच्या सामान्य रचना ह्मणजे वादनांत प्रसिद्ध असलेले प्रचारांतील पंधरा थाट देऊन रागाचें प्रकरण संपविलें आहे.

प्रबंधाविषयीं विवेचन करितांना प्रथम रागात्मक ह्मणजे अनिबद्ध गायन व गीतात्मक ह्मणजे निबद्ध गायन असे गायनाचे मुख्य दोन भेद सांगून छंदोबद्ध गीतामध्यें प्रबंधांचा समावेश कसा होतो हें दाखविलें आहे. नंतर प्रबंधाच्या खंडाच्या संज्ञा व लक्षणें सांगून प्रबंधाच्या पांच अवयवांचीं उद्देशक्रमानें लक्षणें व कार्यें देऊन त्यांचा सध्या प्रचारांत दृष्टोत्पत्तीस येणारे अस्ताई, अंतरा व आभोग हे जे तीन अवयव त्यांच्याशी मेळ घालण्याचा प्रयत्न केला आहे. यापुढें प्रबंधाच्या सहा अंगांचें स्वरूप दाखवून अंगांच्या संख्येवरून झालेल्या प्रबंधाच्या ५ जातींचें दिग्दर्शन केलें आहे, व सर्व प्रकारच्या प्रबंधांचा त्यांत अंतर्भाव कसा होतो हें दाखविलें आहे. पुढें प्रबंधाचे शास्त्रीय तीन वर्ग देऊन रत्नाकरकारानें दिलेल्या ७६ प्रकारच्या प्रबंधांतील लोकप्रसिद्ध प्रबंधांचा समावेश त्यांत करून दाखविला आहे. प्रबंधाच्या भाषेचा विचार करितांना त्यांवरून होण्यासारख्या वर्गांचें दिग्दर्शन करून त्यांतील प्रसिद्ध भाषांच्या प्रबंधांचीं नांवें व स्वरूपें दिलीं आहेत.

प्रचारांतील प्रबंधांच्या सदराखालीं त्यांच्या महत्त्वाच्या दृष्टीनें क्रमानें ध्रुवपद, ख्याल,

टप्पा, हौरी, ठुंबरी, गजल, दादरा, रेख्ता, बैत, रुबाई, कजरी, रसिया, लेज, दोहरा, चोपाई, छपाई, भजनें, गरबी, स्वरावर्त, तिल्लाना, चतुरंग वगैरे हिंदुस्थानी कवनें, प्रबंध, गद्य, अष्टपदी वगैरे संस्कृत कवनें, पद, लावणी, पोवाडा, कटाव, फटका, भूपाळी, आरती, पाळणा, अभंग, ओवी, आर्या, साकी, दिंडी, घनाक्षरी, अंजनीगीत, इत्यादि केवळ मराठी कवनें, व गीत, कीर्तन, वर्ण, जावळी, पल्लवी, रागमालिका, रागसागर वगैरे कर्णाटकी प्रबंध ह्या सर्वांच्या स्वरूपाचें वर्णन देऊन व त्यांतील विशेष सांगून त्यांचा सर्व तऱ्हेनें सांगोपांग विचार केला आहे.

प्रकीर्ण-प्रकरणांत प्रथम वाग्गेयकार गांधर्व, स्वरादि, पदादि, एकल, यमल, वृंद, शारीर, सुशारीर, कुशारीर वगैरे गायनाच्या आनुषंगिक विषयांचीं लक्षणें देऊन आवाजाचे गुणदोष सांगितले आहेत. पुढें गमकांचें सामान्य लक्षण देऊन त्यांच्या विशेष प्रकारांचें विवेचन करून संगीतरत्नाकरकारानें दिलेल्या १५ गमकांचें लक्षणांसह स्वरूप दाखविलें आहे. नंतर सामगायनाचे नारदी शिक्षेंत सांगितलेले १० गुण व लौकिक गायनाचे ह्मणजे प्रचारांतील गाण्याचे ११ गुण ह्यांचें स्वरूप दर्शवून व संगीतरत्नाकरकारानें दिलेले गायकाचे २५ दोष व पारिजातकारानें दिलेले आणखी अधिक ७ दोष ह्यांचीं लक्षणें पूर्णतेनें देऊन गायनविचाराचा उपोद्घात संपविला आहे.

बालसंगीतबोधाच्या तीन पुस्तकांचे क्रमानें मुख्य विषय जे स्वर, ताल व राग ह्यांच्या संबंधाची माहिती पूर्ण करण्याकरितां सरतेशेवटीं त्या त्या विषयास उपयोगी पडणारी तीन परिशिष्टें जोडलीं आहेत. रागासंबंधीं पहिल्या परिशिष्टांत प्रचारांतील रागांचें शास्त्रीयदृष्ट्या वर्गीकरण करण्याचा प्रयत्न केला आहे. स्वरांच्या परिशिष्टांत श्रुति, जाति, ग्राम व स्वरांचें कुल, जाति, वर्ण, ऋषि, देवता, छंद, रस वगैरे विषयांची कोष्टकरूपानें संपूर्ण माहिती दिली आहे. तालाच्या परिशिष्टांत तालांचे बोल, गती व ठेके ह्या संबंधाची पूर्ण माहिती देऊन कोणची गत किंवा ठेका कोणच्या विशिष्ट प्रबंधास अनुकूल आहे ह्याचेंही दिग्दर्शन केलें आहे.

———

## संगीत-लिपि.

एथें संगीत-लिपीविषयीं दोन शब्द लिहिणें फार अगत्याचें आहे. पन्नास वर्षांपूर्वी जेव्हां पाश्चिमात्यांनीं इकडे आपली विशिष्ट राज्यपद्धति, विद्या व कला यांची सुरुवात केली व त्याबरोबर त्यांची रणवाद्यें, स्वरग्रामाच्या पेट्या व इतर वाद्यें, संगीतकला, व संगीतलिपि यांचा इकडील लोकांनी परिचय होऊं लागला, त्या वेळेस आपली संगीतकला केवळ अनभिज्ञ लोकांच्या हातांत गेली असल्यामुळें व त्यांना संगीत-लिपीचा किंबहुना कोणच्याही लिपीचा परिचय नसल्यामुळें आपल्या इकडे संगीत-लिपीच नाहीं, संगीत-लिपि काय ती पाश्चात्यांतच आहे व ती उत्कृष्ट व पूर्णतेस आलेली आहे असा पाश्चात्यांच्या विधानांवरून इकडील बहुतेक साक्षर लोकांचा समज झाला. हा समज दूर करण्याचा मुद्देसूद प्रयत्न प्रथम कलकत्याचे संगीतशास्त्रविशारद राजा शौरींद्रमोहन टागोर यांनीं केला. आपल्या पूर्वीच्या संगीतशास्त्रांत संगीत-



लिपि बऱ्याच पूर्णतेनें दिली आहे इतकेंच नव्हे, तर ती इतर लिपींपेक्षांही चांगली आहे असें त्यांनीं वादविवाद करून सप्रमाण सिद्ध केलें. त्या वेळेस बंगाल्यांत संगीत कलेच्या संबंधानें चिन्हात्मक लिपि चांगली किंवा वर्णात्मक लिपि चांगली याबद्दल मोठा कडाक्याचा वाद सुरू होता. पाश्चिमात्यांची लिपि चिन्हात्मक आहे व आपली वर्णात्मक आहे. लिपि चिन्हात्मक असली ह्मणजे ती पृथ्वीतलावरील कोणत्याही भाषेच्या लोकांस सारखी उपयोगी पडते, व ती अतिशय सोपी जाते, हा चिन्हात्मक लिपीच्या तर्फे मुख्य फायदा दाखविण्यांत येत असतो. हें मत सकृद्दर्शनीं मोठें सयुक्तिक व संग्रहणीय वाटतें. पण त्याविषयीं विशेष सूक्ष्म विचार केला ह्मणजे त्याची निरर्थकता तेव्हांच दिसून येते. कोणत्याही राष्ट्राची अगर जनसमूहाची भाषा व लिपि हीं त्यांचे आचार, विचार व उच्चार यांस अनुकूल अशीच असली पाहिजे. सामान्य भाषेच्या लिपीविषयीं जर इतका नियम दृष्टीस पडतो तर संगीत-लिपीविषयीं विशेषच निबंध असला पाहिजे. पाश्चिमात्यांचें संगीतशास्त्र व कला हीं रणवाद्यप्रधान असून वीर व रौद्र ह्या रसांस विशेष अनुकूल आहेत, किंबहुना त्यांची उत्पत्तीच त्यांपासून झालेली आहे असें म्हटलें तरी चालेल. भारतीय संगीतशास्त्र व कला हीं भक्ति, उपासना, व धर्म ह्यांवर विशेषेंकरून अवलंबून असल्याकारणानें तीं सौम्य स्वभावाचीं असून शांत, करुण व शृंगार ह्या रसांस अत्यंत अनुकूल आहेत, व त्यांची उत्पत्ति व वृद्धि भक्ति व धर्म ह्यांमुळेंच झाली आहे यांत कांहीं संदेह नाहीं. भारतीयांचे आचार विचार व व्यवहार ह्यांमध्यें धर्म व भक्ति ह्यांचें प्राबल्य फार आहे. ह्यांचेंच प्रतिबिंब मनोविकारांतही असतें व मनोविकार स्पष्ट हुबेहुब व ताबडतोब वठविण्याचें मुख्य साधन संगीत-कला ही होय. ह्या प्रकारचा स्वभावतःच दोन्ही ठिकाणच्या शास्त्रांमध्यें व कलांमध्यें भेद आहे व तो भेद व्यक्त करून दाखविण्यास भाषेच्या लिपीप्रमाणें राष्ट्राराष्ट्राची संगीत-लिपीही भिन्न असली पाहिजे हें ओघानेंच प्राप्त होतें. तेव्हां पृथ्वीवरील सर्व राष्ट्रांची भाषा व लिपि एक होईल हें ह्मणणें व ती एक होण्याकरितां प्रयत्न करणें हें जितकें सयुक्तिक व संभवनीय आहे तितकेंच त्यांची त्यांची संगीत-लिपिही एक करण्याचा प्रयत्न करणें उपयुक्त व समंजस आहे असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

वर्णात्मक लिपीपेक्षां चिन्हात्मक लिपि सोपी जाते हेंही ह्मणणें सयुक्तिक नाहीं. चिन्हात्मक लिपीमध्यें सर्व स्वरांना जरी एकच बिंदुरूप चिन्ह कल्पिलें असतें तथापि त्यांचा उच्चनीचभाव, क्रम व पार्थक्य हीं दाखविण्याकरितां त्यांचीं समांतर आडव्या रेषांवर व त्यांच्या अवकाशांमध्यें रचना करणें व अशा तऱ्हेची रचना वाचण्याकरितां डोळ्यांचा अतिशय उपयोग करावयास लागणें व विशेष अवधान ठेवणें हें फार त्रासाचें काम आहे. वर्णात्मक लिपीमध्यें प्रत्येक स्वराचा द्योतक भिन्न वर्ण असल्याकारणानें स्वरांचा क्रम, पार्थक्य व उच्चनीचभाव हा वर्णांमध्येंच स्वतःसिद्ध असतो व त्यांची पाहिजे तशी रचना थोडक्यांत होऊन ती वाचण्यास फार सोपी जाते व डोळ्यांस तितके श्रम पडत नाहींत. शिवाय निरनिराळ्या गमकांचें काम, ज्या संगीत-कलेंत विशेष असतें व प्रत्येक स्वरागणित कांहींना कांहीं तरी विशिष्ट प्रकारचें काम करून

दाखवावयाचें असतें त्या कलेची लिपि वर्णात्मक असल्यानेंच विशेष सौकर्य साधतें हें अनुभवसिद्ध आहे.

आपली संगीत-लिपि वर्णात्मक आहे असें वर सांगितलेंच आहे. स रि ग म प धनि हे सात वर्ण सप्तस्वरांचे द्योतक आहेत. ह्या सात भिन्न वर्णांमध्यें स्वरांचा क्रम, त्यांचा उच्चनीचभाव व पार्थक्य हीं स्वभावतःच सिद्ध झालेलीं आहेत, व संस्कृत भाषेंतल्या वाक्यांतील पदांप्रमाणें ते वर्ण पुढें मागें कोठेंही ठेविले तरी आपलें विशिष्ट स्वरूप तेव्हांच स्पष्ट करून दाखवितात. त्यांना विशिष्ट स्थानाची अपेक्षा असत नाहीं; पाश्चिमात्यांच्या भाषेंत वाक्यांतील पदें नेमलेल्या ठिकाणीं योजिलीं तरच तीं कर्तृकर्मादि विशिष्ट अर्थांचीं वाचक होतात, स्थानभ्रष्ट झालीं असतां होत नाहींत, तशीच त्यांच्या संगीत-लिपींतील चिन्हांलाही नियमित स्थानांची जरूर असते. हें एक वर्णात्मक लिपीमध्यें विशेष सौकर्य आहे व तें भारतीय भाषांच्या रचनेस फार अनुकूल आहे.

स रि ग म प ध नि हे केवळ सात वर्ण मध्य सप्तकांतील सप्तस्वर होत. ह्याच वर्णास वर व खालीं बिंदु अगर लहानशी उभी रेघ दिली ह्मणजे इतर दोन सप्तकें तयार झालीं. उदाहरणार्थ–'स़ रि़ ग़ म़,' 'स रि ग म,' व 'सं रिं गं मं' ह्या तीन रचना क्रमानें मंद्र, मध्य व तार ह्या तीन सप्तकांतील होत. ह्याहिपेक्षां खालच्या व वरच्या सप्तकांतील स्वर दाखविण्याचें कारण पडल्यास त्यांना हींच चिन्हें दोन वेळ, तीन वेळ चार वेळ किंवा जितकी अपेक्षा असेल तितके वेळ द्यावीं ह्मणजे पाहिजे तितक्या सप्तकांचें काम होतें. जसें—स॒ रि॒ ग॒ म॒, व सं॑ रिं॑ गं॑ मं॑ हे क्रमानें अनुमंद्र व अतितार सप्तकांतील स्वर होत. कोमल व अतिकोमल स्वर क्रमानें ग् म्, व ग॒ म॒ ह्या चिन्हांनीं दाखविणें व ग॑ म॑ आणि ग'' म'' ह्या चिन्हांनीं तीव्रतर व तीव्रतम स्वर लिहून दाखविणें फार सयुक्तिक आहे. शुद्ध व तीव्र स्वर चिन्हविरहित ठेविले आहेत.

प्रत्येक स्वर एक मात्रेचा कल्पिला आहे. तोच स्वर अधिक मात्रांचा करावयाचा असल्यास त्याच्या पुढें प्रत्येक मात्रेबद्दल ऽ असें अवग्रहाचें चिन्ह योजिलें आहे. कोणी कोणी दोन मात्रांच्या स्वराकरितां कांहीं चिन्ह न योजितां दीर्घ वर्ण योजितात, पण तीन व अधिक मात्रा दाखविण्यास चिन्ह कल्पिलेंच पाहिजे, याकरितां सामान्येकरून सर्वत्र अवग्रहाचें चिन्ह एक मात्रेकरितां योजणें हें विशेष सयुक्तिक आहे. अर्धी, पाव, एकतृतीयांश, एकपंचमांश वगैरे मात्रांचे विभाग दाखविण्याकरितां प्रत्येक भेदास निराळें चिन्ह कल्पिल्यास गौरव फार होतो व लिपि फार त्रासदायक होते ह्मणून सामान्येकरून पाहिजे तितके स्वर एक मात्रेच्या कालांत उच्चारण्याकरितां ह्मणजे परंपरेनें अर्ध्या पाव वगैरे मात्रेकरितां सरि, सरिग, सरिगम, सरिगमप असें बंधनीरूप चिन्ह कल्पिलें आहे. ह्या चिन्हाच्या योगानें एक मात्रेचा विभाग पाहिजे तितका करितां येतो.

ताल व वेळ ह्यांबद्दल क्रमानें — व ० अशीं चिन्हें अक्षराच्या खालीं योजिलीं



आहेत. = हें चिन्ह समेच्या तालाचें व ≂ हें चिन्ह मुख्य समेच्या तालाचें ह्मणजे अवसानाचें कल्पिलें आहे. हीं तालाचीं चिन्हें तर फारच सुलभ व सयुक्तिक आहेत. एका अस्ताईत तालाची दोन अथवा अधिक आवर्तनें होत असल्यास रागाच्या मुख्य किंवा अंश स्वराचें स्थान मृदंगाच्या विशिष्ट थापेनें दाखवितात तें स्थान अस्ताईतील इतर समांपेक्षां पृथक्तऱ्हेनें व चट्कन लक्षांत यावें ह्मणून मुख्य समेचें असें निराळें चिन्ह कल्पिण्याचें कारण पडलें आहे.

दशविध गमकांपैकीं प्रचारांत वारंवार उपयोगांत येत असलेलीं व बालसंगीतबोधांत ज्यांचा उपयोग इष्ट आहे अशीं तीनच गमकें आहेत. तीं कंप, स्फुरण व आंदोलन हीं होत. कंपाचें चिन्ह ग असें, स्फुरणाचें गँ असें व आंदोलनाचें गॅ असें कल्पिलें आहे.

अलीकडे कांहीं गृहस्थांनीं संगीतकलेवर कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत त्यांत त्यांनीं संगीत-लिपीचीं चिन्हें शास्त्रपरंपरा व युक्ति या दोहोंसही सोडून पाहिजे तितकीं मनास वाटेल तशीं योजिलीं आहेत. अशा प्रकारचीं पुष्कळशीं चिन्हें योजणें मोठ्या कल्पकतेचें द्योतक आहे असें नाहीं. शिवाय अशा प्रकारचीं हवीं तितकीं चिन्हें योजिल्यानें संगीत-लिपि फार बोजड व अवघड होते, व अभ्यासिजनांचें मन त्यांवरून उडून ते पराङ्मुख होतात. शास्त्रपरंपरा व युक्ति ह्यांस धरून योजिलेली लिपीच सर्वमान्य व संग्रहणीय होय.

## गायनाचा उपयोग व माहात्म्य.

शास्त्रांत दिलेल्या नियमांस अनुसरून मुक्तकंठ रीतीनें दररोज नियमानें निदान तास दोन तास वेदपठनाप्रमाणें गायनाचा अभ्यास केल्यास शरीरप्रकृति उत्तम राहते याबद्दल कांहीं एक शंका नाहीं. गायनाच्या योगानें फुप्फुसांतील प्राणवायूस योग्य व नियमित चालन मिळून रक्त शुद्ध होतें व रुधिराभिसरण चांगलें होऊन अन्नपचनास फार मदत होते; आणि अशा तऱ्हेनें अहारविहार नियमित झाल्याच्या योगानें शरीरारोग्य उत्कृष्ट राहून मन सदोदित उल्हसित राहतें. शरीर व मन हीं दोन्हीही सतत उत्साहयुक्त व उल्हसित असल्या कारणानें कोणतेंही श्रमसाध्य कार्य अनायासें पार पाडण्यास इच्छा व शक्ति असते. ह्या प्रकारें सतत कृतकार्य झाल्यानें मनुष्यास ऐहिक सुख सहज प्राप्त होतें. गायनाच्या योगानें स्वतांचें जसें मनरंजन होतें त्याप्रमाणें आप्तइष्ट, मित्रबंधु इत्यादिकांचें मनरंजन करितां येतें इतकेंच नव्हे, तर दुष्ट, दुराचारी, व्यसनी व शत्रु इत्यादिकांचेंही रंजन करून त्यांचें मन वळवून त्यांना सत्कार्याकडे लावितां येतें. आणि ह्या योगानें परोपकार व देशकार्यही साधून पुण्यप्राप्ति होऊन पारत्रिक सुखाचेंही साधन होतें. हा गायनाचा उपयोग कांहीं सामान्य नाहीं.

गायनाचें माहात्म्यही फार मोठें आहे. प्रत्यक्ष ब्रह्मदेवानें सामवेदापासून सप्तस्वर घेऊन त्याचा संग्रह केला आहे. पार्वतीपति शंकर गायनाच्या योगानें फार संतुष्ट

होतो. गोपीवल्लभ भगवान् श्रीकृष्ण मुरलीच्या नादांत अगदीं तल्लीन होऊन जातो. ब्रह्मदेवास सामगायन फार प्रिय आहे. ऐहिक व पारलौकिक सर्व सुख टाकून आपली महती नांवाची वीणा वाजवीत नारद मुनि सतत ब्रह्मानंदामध्यें गढून गेलेला असतो. वाग्देवता सरस्वती ही आपली कच्छपी वीणा घेऊन सर्वकाळ गायनवादनांत रममाण झालेली असते. मग इतर देव, दानव, यक्ष, गंधर्व, किन्नर व मानव गायनास लुब्ध होतील यांत काय शंका आहे. ज्याला विषयास्वाद ह्मणजे काय हें अद्यापि कांहींच माहीत नाहीं असा अगदीं लहान बालक देखील रडत असतां मातेनें पाळण्यांत घालून त्याच्यावर सुस्वर गाणीं गाइलीं ह्मणजे तो मधुर नाद ऐकून बालकाला पराकाष्ठेचा हर्ष होतो व तो आनंदानें खेळूं लागतो किंवा सुखानें झोंपीं जातो. वनामध्यें तृण खाऊन यथेच्छ संचार करणारे मृग पशु पारध्याच्या गाण्यास लुब्ध होऊन त्याच्या पाशांत सांपडतात व प्राणास देखील मुकतात. मोठी फणा काढून क्रोधानें विषाचे फूत्कार टाकीत असलेला नाग देखील गारुड्याच्या पुंगीचा नागसूर ऐकून आनंदित होत्साता फणा डोलवूं लागतो[1].

भगवत्प्रसाद होण्याकरितां श्रीविष्णूची षोडशोपचार पूजा करीत असतांना दररोज गीत, नृत्य, वाद्य हीं समर्पण करावीं असें शास्त्रांत सांगितलें आहे. ‘ नारदा मी वैकुंठाचे ठिकाणीं राहत नाहीं व योग्यांच्या हृदयांमध्येंही राहत नाहीं, तर माझे भक्त जेथें माझे गुणानुवाद गातात तेथें मी सतत अध्यक्ष उभा असतों ’. असें स्वतः भगवंतांनीं नारदास पुराणांतरीं सांगितलें आहे. वीणा वाजविण्याचें तत्त्व जाणणारा, श्रुति जाति इत्यादिकांमध्यें निष्णात व ताल अवगत असलेला मानव अनायासानें मोक्षास जातो, असें याज्ञवल्क्यस्मृतीमध्यें वचन आहे. अश्वमेधामध्यें अतिसुस्वर वीणा वाजविणारे व गाणारे दोन ब्राह्मण असावे असें ‘ गायेतां ब्राह्मणौ ’ ह्या श्रुतिवचनांत सांगितलें आहे. एकंच श्रुतिस्मृतिपुराणेतिहासादिकांत गायनाची फार थोरवी गाइली आहे. अशा प्रकारच्या गायनाचें महत्त्व वर्णन करण्यास कोण समर्थ आहे! अश्वमेधादिकांचे समयीं गायन केल्यानें धर्म साधतो; चतुर गायकास गानप्रिय राजादिकांपासून द्रव्य प्राप्त होतें; गायनापासून आनंद होऊन मनकामना तृप्त होतात; नादोपासनेच्या योगानें ब्रह्मानंद होऊन मोक्ष प्राप्त होतो असें श्रुतिस्मृति सांगतात. सारांश, धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारी पुरुषार्थ एकदम साधण्यास गायन हें एकच व प्रमुख साधन आहे असें ह्मटल्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं[2].

गीताच्या महिमा याहीपेक्षां अधिक असून तो अपरिमेय आहे असें कुंभकर्ण नरेंद्रानें आपल्या संगीतराज ग्रंथांत मोठ्या मार्मिकपणानें व सहृदयतेनें वर्णन केलें आहे. गीत हें रोग्याची मृतसंजीवनी मात्रा, विरहिजनांचें मन रंजविणारी प्रिय वस्तु, यो-

1. संगीत-रत्नाकर-१. १; संगीतदर्पण-१. १५-१७; संगीत-पारिजात-१.

2. संगीत-रत्नाकर-१. १. २५-३०.; संगीत-पारिजात—७-१९.; रागविबोध—द्वितीय विवेक-४.५.



ग्यांचा परम ध्यानाचा विषय, दीन व दुःखित यांचें मोठें विश्रांतिस्थान, दरिद्यांचा अनुपमेय ठेवा, सर्पांचा व भोगिलोकांचा मोहिनी मंत्र, व प्रेमवश लोकांची वशीकरणकला होय. याचकरितां इतर सर्व कार्यव्यवसाय टाकून मुनिजन नादोपासना करितात. स्वर्गस्थ झालेल्या जनास पुनः भूतलावर जिवंत करून आणण्याची ज्याची शक्ति आहे असें कविवाणीस अगोचर जें गायन त्याचें माहात्म्य वर्णन करण्यास कोण समर्थ आहे[1].

## भारतीय संगीतशास्त्राचा त्रोटक इतिहास.

आपले मनोगत विचार व विकार एकमेकांस स्पष्ट, त्वरित, व निश्चितपणें कळविणें हें व्यवहाराचें मुख्य बीज आहे व ह्याकरितां भाषा, शब्द ह्मणजे ध्वनिकार, व चेष्टा ह्यांचा उपयोग प्रसंगवशात् पृथक् किंवा एकत्र करणें सर्वत्रांस इष्ट व अवश्य आहे. भाषेची पात्रता केवळ मनुष्यप्राण्यासच आहे. चेष्टा व ध्वनिविकार ह्यांचा उपयोग प्राणिमात्रास साधारण आहे. तेव्हां वर्णात्मक शब्द ह्मणजे भाषा, अनुरणनात्मक ध्वनि व चेष्टा हीं क्रमानें ज्यांत प्रधान आहेत असें गायन, वादन व नर्तन ह्मणजे परंपरया सांग संगीत हें प्राणिमात्राच्या व्यवहारास अत्यंत आवश्यक आहे व त्याची उत्पत्ति भाषेबरोबर किंबहुना प्राणिमात्राच्या उत्पत्तीबरोबरच झाली असली पाहिजे.

मानव प्राण्याच्या आद्य व्यवहाराची साक्ष देणारे पृथ्वीवरील अत्यंत प्राचीन व सर्वांपेक्षां पूर्वींचे ह्मणजे अनादि ग्रंथ म्हटले ह्मणजे आपले परमपूज्य वेद होत हें आज कोणास नव्यानें सांगावयास पाहिजे असें नाहीं. याविषयीं प्राचीन, अर्वाचीन, स्वदेशी, विदेशी, आर्य, अनार्य सर्व लोकांचें ऐकमत्य आहे. वेदचतुष्टयीमध्यें ऋग्वेदाचें प्राथम्य आहे ही गोष्ट पूर्वपरंपरेस अनुसरून सायणाचार्यांनीं प्रस्थापित केली आहे व ती सर्वांस मान्य आहे. ऋग्वेद हा छंदोरूप असून उदात्त, अनुदात्त, स्वरित आणि कंप इत्यादि स्वरविकारांनीं व लघु, गुरु व प्लुत इत्यादि मात्राभेदांनीं युक्त असल्याकारणानें तो गीताचें मूलस्वरूपरूपच आहे असें म्हटल्यास कांहीं हरकत नाहीं. शिवाय ‘ तस्मा इंद्राय गायत, ’ ‘ गायेतां ब्राह्मणौ ’ इत्यादि गायनास अनुकूल अशीं स्पष्ट श्रुतिवचनेंही शास्त्रांतर्गत बरींच आहेत. ऋक्तंत्रामध्यें श्वास, नाद व वर्ण ह्यांचा भेदाभेद स्पष्ट करून दाखविला आहे. पाणिनीय शिक्षेंत स्वर कसा उत्पन्न होतो हें सांगून सप्तस्वर व त्यांचीं स्थानें व त्यांचा उदात्त, अनुदात्त, व स्वरित ह्यांमध्यें कसा अंतर्भाव होतो हें दाखवून रंग व कंप यांचें उच्चारण कसें करावें ह्याबद्दल सविस्तर निरूपण केलें आहे. ऋक्प्रातिशाख्यांत सप्तस्वरांविषयीं व मात्रांविषयीं बराच सूक्ष्म विचार केला आहे. संपूर्ण सामवेद गायनाचाच वेद आहे; व सामवेदाचे पुष्पसूत्रांत

1. जयदेव कवीनें अष्टपदींचें गायन करून आपल्या पत्नीचें प्रेत जिवंत केलें ह्या दंतकथेवर ग्रंथकाराचा एथें कटाक्ष दिसतो.

2. कुंभकर्णनरेंद्रकृत संगीतराज—तृतीय परीक्षण ८२-८३.

गायनाचा सांगोपांग विचार केला आहे. नारदी-शिक्षेंत तर समग्र संगीतशास्त्र भरलें आहे. नाद, स्वर, ग्राम, मूर्छना, तानें, ताल, गमक, गायनाचे गुणदोष, गात्रवीणा, दारवी वीणा, श्रुतिवीणा, वगैरे संगीतशास्त्रांतील सर्व मुख्य विषयांचें सविस्तर विवेचन केलें आहे. याप्रमाणें श्रुतिग्रंथांत संगीतशास्त्रांतील मुख्य मुख्य विषयांचें विवेचन आहे इतकेंच नव्हे तर आयुर्वेद व धनुर्वेद यांप्रमाणें गांधर्ववेद हा पांचवा वेद मानिला आहे.

केवळ श्रुतिग्रंथांतच संगीतशास्त्रांतील विषयांचा विचार केलेला व त्यांची महती गाइलेली आढळते असें नाहीं; तर स्मृति, इतिहास व पुराणें ह्या ग्रंथांतही संगीताचा ऊहापोह बराच आहे. मनु, याज्ञवल्क्य व नारद ह्यांच्या स्मृतींमध्यें श्रुति, स्वर, जाति वीणावादन, ताल, वगैरे विषयांबद्दल ठिकठिकाणीं उल्लेख आहे. तसेंच अग्निपुराण, वराहपुराण, विष्णुपुराण, व वायुपुराण ह्यांमध्येंही छंदःशास्त्र, अलंकारशास्त्र, व्याकरणशास्त्र वगैरे शास्त्रांतील माहितीनें भरलेले जसे कांहीं अध्याय आहेत त्याप्रमाणें संगीतशास्त्रांतील विषयांकडेही कांहीं अध्याय आले आहेत. वायुपुराणांत ८६ व ८७ ह्या दोन अध्यायांत संगीतशास्त्रांतील बऱ्याच विषयांचा समावेश केला आहे. ८७ व्या अध्यायाच्या प्रारंभीं पूर्वाचार्यांच्या मताप्रमाणें मी तुह्मांस ३०० अलंकार सांगतों असें सूत शौनकादि ऋषींप्रत ह्मणतात !

परंतु ह्या सर्व ग्रंथांत संगीतांतील विषयांचें जें विवेचन आहे तें अव्यवस्थित स्वरूपाचें असल्याकारणानें शास्त्रपद्धतीस धरून नाहीं. संगीताचें शास्त्रीय पद्धतीचें विवेचन भरत मुनीच्या नाट्यशास्त्रापासून सुरू झालें.

आपल्या भरतखंडांत संगीतशास्त्रकर्ते अनेक होऊन गेले आहेत. त्यांपैकीं भरत, कश्यप, मतंग, वेण, याष्टिक, कोहल, विशाखिल, दंतिल, कंबल, अश्वतर, विश्वावसु, नारद, तुंबरु, हनुमान्, रावण, नंदिकेश्वर, बिंदुराज, क्षेत्रराज, रुद्रट, नान्यभूपाल, भोजराज, परमर्दी, सोमेश, जगदेकमल्ल, भरतनाट्यशास्त्राचे व्याख्यानकार लोल्लट, उद्भट, शंकुक, भट्ट अभिनवगुप्त, इत्यादि संगीतशास्त्रविशारदांचा उल्लेख शार्ङ्गदेवानें आपल्या संगीतरत्नाकर नामक ग्रंथांत व अहोबलानें आपल्या संगीतपारिजात नामक ग्रंथांत केला आहे. हे व इतर संगीतशास्त्रविशारद जे पूर्वी होऊन गेले त्या सर्वांच्या मतांचें मंथन करून त्यांचें सार आपल्या ग्रंथांत दिलें आहे असें शार्ङ्गदेवानें प्रतिज्ञापूर्वक सांगितलें आहे. परंतु ह्यांतील बहुतेकांचे ग्रंथ हल्लीं उपलब्ध नाहींत.

सध्या उपलब्ध असलेल्या ग्रंथांपैकीं प्रचारांत असलेले संगीतशास्त्राचे मान्य ग्रंथ ह्मणजे भरतमुनिकृत नाट्यशास्त्र[1], निःशंक शार्ङ्गदेवकृत संगीतरत्नाकर[2], चतुर दामोदरकृत संगीतदर्पण[1], अहोबल पंडितकृत संगीतपारिजात[2], सोमकविकृत रागविबोध[3], कुंभकर्ण नरेंद्रकृत संगीतराज, पुंडरीक विठ्ठलकृत रागमाला[5] वगैरे ग्रंथ होत. ह्या सर्वांत संगीतरत्नाकर हा ग्रंथ मोठा व्यापक असून फार महत्त्वाचा आहे. ह्या ग्रंथांत संगीताच्या सर्व स्कंधांचें व विषयांचें मार्मिक रीतीनें विवेचन केलें आहे. याच्या तोडीचा दुसरा ग्रंथ संगीतशास्त्रांत कोणताही नाहीं. संगीत-रत्नाकरावर चतुर कल्लिनाथाची[6] सर्वमान्य टीका आहे. ही टीका मोठी मार्मिक, व्यापक, व व्युत्पादक अशी आहे. संगीतराज हा ग्रंथ रत्नाकराच्या तोडीचा दिसतो, परंतु तो संपूर्ण कोठें मिळत नाहीं. संगीतदर्पण हा ग्रंथही बऱ्याच योग्यतेचा आहे. संगीतरत्नाकराचें साररूप हा ग्रंथ असून रत्नाकराच्या खालोखाल याचें महत्त्व आहे. भरत-नाट्यशास्त्रांत संगीतांतील नाट्यस्कंधाचा व त्यास प्रत्यक्ष उपयोगी पडणाऱ्या विषयांचा ऊहापोह विशेष केला आहे. ह्याही ग्रंथांत संगीताच्या सर्व विषयांचें विवेचन आहे. रत्नाकारापेक्षां संगीतदर्पणांत तालांचें विवेचन फार विस्तारानें केलें आहे. इतर ग्रंथांत संगीतांतील कांहीं कांहीं विषयांचें विवेचन आहे. उदाहरणार्थ, रागविबोध व रागमाला ह्या दोन ग्रंथांत स्वर व राग ह्यांचेंच विवेचन आहे. रागविबोध हा ग्रंथ प्रौढ व मार्मिक आहे. ह्या सर्व ग्रंथकारांचा उद्देश पूर्वीचें शास्त्र देऊन त्या त्या वेळचे फेरफार सांगून दोहोंचा मेळ घालण्याचा दिसतो. सोमनाथानें विकृत स्वर मेळ व राग यांचा विचार विस्तारानें करून लक्ष्य व लक्षण यांचा विरोधपरिहार करण्याचा प्रयत्न केला आहे. दामोदरानें तालांची माहिती विस्तारानें देऊन प्रचारांतील ताल बरेच सांगितले आहेत. तानसेनानें आपल्या संगीतसार नामक ग्रंथांतही आपल्या वेळीं प्रचारांत असलेल्या गोष्टींचें थोडक्यांत स्वरूप सांगितलें आहे. जयपुरचे महाराज सवाई प्रतापसिंह ह्यांनीं केलेला राधागोविंद-संगीतसार हा हिंदी भाषेंतील ग्रंथ फार विस्तृत असून व्यापक आहे. ह्या ग्रंथांत संगीतांतील सर्व विषयांचें पूर्वपीठिका देऊन फार विस्तारानें विवेचन केलें आहे, व आपल्या वेळच्या संगीताच्या स्वरूपाचें दिग्दर्शनही केलें आहे. परंतु ह्या सर्व ग्रंथांत दिलेलें शास्त्राचें स्वरूप व त्या त्या वेळचे प्रचार आणि सध्या प्रचलित असलेलें संगीतकलेचें स्वरूप या दोहोंमध्यें फार भेद दृष्टोत्पत्तीस येतो.

---

१. सुमारें दीड हजार वर्षांपूर्वीचा ग्रंथ.

२. शार्ङ्गदेवानें संगीत-रत्नाकर हा ग्रंथ ईसवी सनाच्या तेराव्या शतकाच्या पूर्वार्धांत रचिला. ह्याचाच 'अध्यात्मविवेक' ह्या नांवाचा आणखी एक ग्रंथ प्रसिद्ध आहे.

---

१. हा पंधराव्या शतकांतील ग्रंथ असावा.

२. संगीत-पारिजाताचें भाषांतर फारसी भाषेंत अवरंगझेब बादशहाच्या कारकीर्दींत ह्मणजे १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत झालें असल्यामुळें त्याच्या पूर्वी निदान एक शतक तरी हा ग्रंथ प्रसिद्धीस आला असला पाहिजे; ह्मणजे संगीत-पारिजात हा ग्रंथ १६ व्या शतकांत निर्माण झाला असावा.

३. सोमनाथानें रागविबोधाच्या शेवटीं अखेरच्या पद्यांत ग्रंथरचनाकाल दिला आहे. तो असा—आश्विन शुद्ध प्रतिपदा, सोमवार, शके १५३१.

४. हा ग्रंथ बराच अर्वाचीन दिसतो. ह्या ग्रंथाची लेखनशैली बरीच प्रौढ, अलंकारिक, व विस्तृत आहे.

५. पुंडरीक विठ्ठल हा १७ व्या शतकांतील ग्रंथकार होय.

६. चतुर कल्लिनाथाची स्थिति अनुमानानें पंधराव्या शतकांत निश्चित करितां येते.

भरतखंड हें सर्व संपत्तींचें व सुखसाधनांचें माहेरघर व सृष्टीचें विलासस्थान अस-
ल्यामुळें श्रीरामचंद्र व युधिष्ठिर यांच्यापासून आज तागायत शेंकडों देशी व विदेशी,
स्वधर्मी व विधर्मी लोकांच्या व राजांच्या राज्यतृष्णेमुळें त्यांच्या ताब्यांत गेल्यानें
समाज, धर्म, नीति, शास्त्रें, कला इत्यादि गोष्टींत फार परिवर्तन झालें आहे. कांहीं
समाज, धर्म व नीतितत्वें, शास्त्रें व कला नष्टप्राय झालीं आहेत; व कांहीं नवीनच
उत्पन्न झालीं आहेत. इतर शास्त्रें व कला यांच्याप्रमाणें संगीतशास्त्र व कला यां-
च्यामध्येंही फार फरक झाला आहे. किंबहुना संगीतशास्त्र असें प्रायः नष्टच झालें
आहे ह्मटल्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. उरलें आहे तें फक्त कोठें कोठें दृष्टीस पड-
णारी कला होय. यवनांच्या वेळेस ही कला धर्मबाह्य मानिली असल्यामुळें व उच्च
प्रतीच्या लोकांनीं तिचा अव्हेर केल्यामुळें हलक्या दरजाच्या लोकांत तिचा शिरकाव
झाला, व त्या योगानें तिचें शुद्ध व उज्ज्वल स्वरूप नाहींसें होऊन तिला हीनदशा
प्राप्त झाली. तथापि पुढें कांहीं दिवसांनीं हिंदु व यवन यांचें विशेष संघट्टन झाल्या-
मुळें कांहीं बादशहांनीं व श्रेष्ठ लोकांनीं तिला हातीं धरिलें व तिचें पुनरुज्जीवन केलें.
तानसेन, नायक गोपाळ, नायक बैजू वगैरे मंडळी याच वेळची होत. हिंदुधर्माचा
पक्का द्वेष्टा व मुसलमानी धर्माचा कट्टा अभिमानी जो अलमगीर (अवरंगझेब)
बादशहा त्याच्या खुद्द अमदानींत 'तोहफ़तुल् हिंद' ह्या नांवाचा साहित्य व संगीत
शास्त्रावरील व्यापक ग्रंथ निर्माण झाला. ह्या ग्रंथाचे सात बाब ह्मणजे अध्याय
आहेत. त्यांतील पांचव्या अध्यायांत संगीताचें विवेचन आहे. इतर अध्यायांत छंद,
अलंकार, रस वगैरे विषय आहेत. तसेंच त्याच्याच वेळेस संगीत पारिजाताचें
फारसी भाषेंत रूपांतर झालें व इतर ग्रंथही रचले गेले. तथापि ह्या वेळेस व नंतर शा-
स्त्राची परंपरा बहुतेक नष्ट झाली असल्यामुळें कलेस शास्त्राचें पाठबळ फारसें मिळालें
नाहीं. संगीतशास्त्रांतील तीन स्कंधांपैकीं नृत्य स्कंध अगदींच नष्टप्राय झाला. नर्त-
नकला कांहीं थोडीशी उत्तर हिंदुस्थानांत अयोध्या वगैरे प्रांतांत व कर्णाटकांत तंजावर
प्रांतांत अद्यापि धुगधुगी राखून आहे. वाद्यकलेंत मुसलमानांनीं सतार[1], बीन[2], ताऊस[3],
सरोद[4] वगैरे वाद्यें नवीन निर्माण करून त्यांचे बोल व गति नवीन कल्पून थोडीशी
भर घातली आहे. पण तिचा पूर्वींच्या शास्त्राशीं फारसा मेळ नाहीं. गायनांत
विकृत स्वरांचा फार संकोच झाल्यामुळें मेळ व राग यांच्या स्वरूपांत व नांवांत
फार फेरबदल झाला आहे. नाहीं म्हणावयास पदें[5], ध्रुवपद[6], ख्याल[7], टप्पा[8] वगैरे

---

१. अमीर खुसरू यानें सतार प्रचारांत आणिली.
२. बीन हें रुद्रवीण्याचें रूपांतर दिसतें.
३. हें फारशी (इराणी) लोकांचें वाद्य आहे. यांत सारंगी व सतार यांचा मिलाफ केला आहे.
४. हें अफगाण लोकांचें वाद्य आहे.
५. तुलसीदास, सूरदास, पुरंदरदास, अमृतराय, केशवस्वामी वगैरे कवि पदांचे पुरस्कर्ते होत.
६. तानसेन, बैजूबावरे, प्रेमदास, सूरदास, चिंतामणि मिश्र हे ध्रुवपदाचे प्रवर्तक होत.
७. सदारंग, अधारंग व मनेरंग हे ख्यालाचे कर्ते प्रसिद्ध आहेत.
८. षोरी मिया यानें टप्प्याचें गाणें प्रथम प्रचारांत आणिलें.



कवितेचे प्रकार नवीन बनवून प्रबंधाध्यायांत थोडीशी भर घातली आहे, पण ती ही फारशी शास्त्रास धरून नाहीं. तालांचें परिवर्तन तर फारच चमत्कारिक झालें आहे. पूर्वीचे बहुतेक शास्त्रोक्त ताल नामशेष होऊन त्यांच्या जागीं नर्तनास उपयोगीं पडणारे मृदंगाचे बोल व गति ताल ह्मणून प्रचारांत आले आहेत. त्यांतही सप्तताल व त्यांच्या प्रत्येकाच्या पांच जाति मिळून ३५ ताल कर्णाटकांत प्रचलित आहेत. पण उत्तर हिंदुस्थानांत यांतील दहा पंधराच ताल प्रसिद्ध आहेत, व कित्येकांचीं नांवेंही नवीनच आहेत. मृदंग किंवा पखवाज ह्मणजे पक्षवाद्य हें पूर्वी आपल्या आवाजाच्या व गतींच्या योगानें गायनास व नर्तनास जोडगण देणारें होतें तें हल्लीं नुसत्या तालाच्या कोटींत घातल्यामुळें त्यावर वाजवितां येणारे ताल तेवढे उत्तर-हिंदुस्थानांत प्रचलित आहेत. मृदंगावर इतर ताल वाजवितां येणार नाहींत असें नाहीं, पण तशी खटपटच कोणी केलेली दिसत नाहीं. आपल्याकडे कांहीं नामां-कित तालज्ञ पंडित आहेत त्यांनीं ह्या दिशेनें प्रयत्न केल्यास काय होणार नाहीं ? कर्णाटकांत ३५ ताल वाजविणारे मृदंग नारायणस्वामीसारखे कांहीं तालज्ञ अद्यापि आहेत असें ऐकिवांत आहे, पण त्यांनींही शास्त्रोक्त तालांचें पुनरुज्जीवन केलेलें दिसत नाहीं.

याच वेळेस महाराष्ट्रांतही थोडी चळवळ झालेली दिसते. केशवस्वामी, रंगनाथस्वामी, उद्धव चिद्घन, अमृतराय, अनंतफंदी वगैरे साधु कवींनीं पदें, कटाव, फटके वगैरे कवनें करून प्रबंधाध्यायांत थोडीशी भर घातली. रामजोशी यांनीं लावणीची चाल नवीन कल्पून त्या छंदांत शृंगार व शांत रसपर बरींच कवनें करून लोकांस मनरं-जनपूर्वक नीतीचा उपदेश करण्याचा प्रयत्न केला. याशिवाय पुष्कळ कवींनीं आ-रत्या, भूपाळ्या, पाळणें वगैरे कवनें केलेलीं प्रसिद्ध आहेत. उत्तर हिंदुस्थानांत तुलसीदास, सूरदास, कबीर, कमाल, नानक, ह्यां चैतन्य सारखे व गुजराथेंत नरसी मेहता, प्रेमानंद, मिराबाई सारखे भगवद्भक्त कवि होऊन त्यांनींही भक्तिपर कवनें पुष्कळ के-लेलीं आढळतात. पण ह्या सर्व रचनेमध्यें कवित्वाचा व भक्तीचा अगर उपदेशाचा अंश विशेष असल्यामुळें संगीतशास्त्र असें फारसें पुढें आलें नाहीं. नाहीं म्हणावयास उत्तर हिंदुस्थानांत कलकत्त्यास राजा शौरींद्रमोहन टागोर ह्या विद्वान् गृहस्थांनीं रत्नाकर, दर्पण व पारिजात ह्यांस धरून व दक्षिणेंत कर्णाटकांत गोविंददीक्षित, त्यागराज, पुरंदर-दास, वेंकटमखी, सुब्बय्या वगैरे अनेक पंडितांनीं भरत–कल्पलता–मंजरीस अनुसरून संगीतशास्त्राचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न केला. राजा शौरींद्रमोहन टागोर ह्यांनीं 'संगीतशास्त्राचा इतिहास.' 'सहा मुख्य राग,' 'श्रुति व स्वरसप्तकें,' 'नृत्यांकुर,' वगैरे संगीत शास्त्राचे बरेच ग्रंथ इंग्रजींत नवीन लिहिले आहेत, व संगीत–दर्पण ह्या ग्रंथाचा एक भाग सटीक छापविला आहे. गोविंददीक्षित, वेंकटमखी व सुब्बय्या यांनीं तिकडे संगीतशास्त्राचें बरेंच परिवर्तन केलें म्हटल्यास कांहीं हरकत नाहीं; व सध्यांचें कर्णा-टकांतील संगीतशास्त्र व कला यांचें स्वरूप सर्वांशीं यांच्या कृतीवर अवलंबून आहे. कर्णाटकांत सध्या प्रसिद्ध असलेले सोळा स्वर, ७२ मेळ, १००१ राग व त्यांच्या संज्ञा, व ३५ ताल हे सर्व यांनीं प्रचारांत आणिले आहेत. अगदीं अलीकडे शिंगराचार्लु

यांनीं ह्या प्रचलित असलेल्या शास्त्रास व कलेस धरून संगीताचीं ९ क्रमिक पुस्तकें
तयार केलीं आहेत. याच शास्त्रास धरून क्याप्टन डे ह्यांनीं 'दक्षिणेंतील संगीत व
वाद्यें' ह्या नांवाचा ग्रंथ पंधरा वर्षांपूर्वी लिहून प्रसिद्ध केला आहे. सर विल्लियम
जोन्स, क्याप्टन विलर्ड वगैरे गृहस्थांनीं पूर्वी भारतीय संगीत शास्त्रावर एशियाटिक
सोसायटीपुढें बरेच निबंध वाचले आहेत. मद्रासिकडील प्रसिद्ध विद्वान् व नाना-
भाषाकोविद चिन्नस्वामी यांनीं तर मोठ्या मेहनतीनें व द्रव्याचा अपरिमित व्यय करून
व 'प्राच्य संगीत' ह्या नांवाचा ग्रंथ इंग्रजींत लिहून आपलें संगीत उत्तम आहे व
पाश्चिमात्यांच्या प्रचलित संगीतलिपीनें तें पाहिजे तसें लिहून दाखवून त्यांसही तें प्रिय
कारितां येईल हें सप्रयोग सिद्ध करण्याचा भगीरथ प्रयत्न केला, पण तो सर्व अनाठायीं
गेला आहे. त्या योगानें आपल्या लोकांसही फारसा उपयोग झाला नाहीं, व होणें शक्य
नाहीं; व पाश्चिमात्यांसही तें प्रिय वाटणार नाहीं. याचें कारण उघड आहे, व तें मार्मिक
लोकांच्या सहज लक्षांत येण्यासारखें आहे. उत्तर हिंदुस्थानांत दिल्ली, लाहोर व कानपूर
एथें हाजी महंमद मरदानअली खान यांचा 'गुंच-ए-राग' हा ग्रंथ, सादकअली खान
यांचा 'कानून मुसीकी' हा ग्रंथ, गुसांई (गोस्वामी) पन्नालाल यांचा 'नाद विनोद'
हा ग्रंथ वगैरे फारसी व ऊर्दू ग्रंथ सध्याच्या कलेस धरून लिहिलेले प्रसिद्ध आहेत;
तसेच काठेवाडांत भावनगरास तयार झालेले 'संगीत-कलाधर' व 'संगीत-चिंतामणि'
हे दोन गुजराथी ग्रंथ अलीकडे प्रसिद्ध झाले आहेत. आपल्या खुद्द महाराष्ट्रांतही कै०
अष्टपुत्री शास्त्री, व विश्वनाथ बोवा काळे, रा. बाळकृष्ण बोवा इचलकरंजीकर, रा.
पुरुषोत्तम गणेश ऊर्फ अण्णा घारपुरे, मुरारबोवा गोवेकर, नानासाहेब पानसे, वाईकर
चौंडे शास्त्री यांनीं व गुजराथेंत पंडित आदित्यरामजी, प्रो. मौलाबक्ष, पिंगळे व बर्वे
यांनीं व अगदीं अलीकडे विष्णुबोवा पलुसकर, माळवे, मनोहर वगैरे गृहस्थांनीं
सध्याच्या संगीत कलेस धरून कांहीं पुस्तकें लिहून संगीतशास्त्राचें पुनरुज्जीवन
करण्याचा यथामति उद्योग सुरू केला आहे, पण तो फारसा पूर्वींच्या शास्त्रास धरून
नाहीं व पूर्णतेसही गेलेला नाहीं.

अशा प्रकारानें सध्याच्या काळीं परंपरा सुटल्यामुळें शास्त्रास व कलेस आलेली
ग्लानि नाहींशी करून शास्त्रास चालन देऊन कलेचा कलंक काढून टाकून तिचें स्वरूप
सशास्त्र व उज्ज्वलित करणें हें प्रत्येक शास्त्राभिवृद्धि करूं इच्छिणाऱ्या सद्गृहस्थाचें
कर्तव्य आहे. त्यास पूर्वींची शास्त्रपरंपरा व सध्याचा प्रचार ह्यांचा होईल तितका ऊ-
हापोह करून दोहींचा मेळ घालण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ह्या प्रकारचा शास्त्राचा
व कलेच्या प्रचाराचा मेळ घालून शास्त्र वृद्धिंगत करण्याचा यथामति प्रयत्न करण्या-
चा उद्देश प्रस्तुतच्या लेखाचा आहे. तो कितपत सिद्धीस गेला आहे हें पाहणें संगी-
तशास्त्रविशारद व कलानिपुण पंडितांकडे आहे.

नारायण पेठ, पुणें.
ता. १९ डिसेंबर, १९०६.

ना. दा. बनहट्टी.

## सांकेतिक चिह्नें.

| | |
|---|---|
| ‿ | = कोमल स्वर. जसें-म् = कोमल मध्यम. |
| ‿‿ | = अतिकोमल स्वर. जसें-ध् = अतिकोमल धैवत. |
| –‘ | = तीव्रतर स्वर. जसें-ग‘ = तीव्रतर गांधार. |
| –“ | = तीव्रतम स्वर. जसें-म“ = तीव्रतम मध्यम. |
| ॰ (खालीं) | = मंद्र स्वर. जसें-ग़ = मंद्रसप्तकांतील गांधार. |
| ॰॰ (खालीं) | = अनुमंद्र स्वर. जसें-ग़॰ = अनुमंद्रसप्तकांतील गांधार. |
| ॰ (वर) | = तार स्वर. जसें-पं = तारसप्तकांतील पंचम. |
| ॰॰ (वर) | = अतितार स्वर जसें- सं॑ = अतितारसप्तकांतील षड्ज. |
| – | = साधारण ताल. |
| = | = समेचा ताल. |
| ≡ | = मुख्य समेचा ताल. |
| ० | = काल. स्वराच्या किंवा अक्षराच्या खालीं दिलेलें पोकळ शून्य ह्मणजे कालाची खूण होय. |
| ० | = अक्षराच्या पुढें आलेलें पोकळ शून्य गणांताचें ह्मणजे त्याच अक्षराचा स्वर लांबविण्याचें चिह्न होय. |
| ऽ | = एक मात्रेची खूण |
| ⌒ | = दोन किंवा अधिक स्वर एका मात्रेच्या कालांत ह्मणण्याचें चिह्न. |
| ω | = स्फुरण. |
| ~ | = कंप. |
| ⌣ | = आंदोलन. |
| आ. | = आरोह. |
| अ., अव. | = अवरोह. |
| शु. | = शुद्ध. |
| को. | = कोमल. |
| ती. | = तीव्र. |

ध्रु. = ध्रुवपद, ह्मणजे कडव्याच्या शेवटीं वारंवार उच्चारण्याचा पद्याचा प्रारंभाचा भाग.

च. जा. = चतुरस्र जाति.

त्र्य. जा. = त्र्यस्र जाति.

मि. जा. = मिश्र जाति.

म. ल. = मध्य लय.

द्रु. ल. = द्रुत लय.

वि. ल. = विलंबित लय.

अ. = अस्ताई.

अं. = अंतरा.

---

# अनुक्रमणिका.

---

॥ श्रीः ॥

# बालसंगीतबोध.

## पुस्तक तिसरें.

### उपोद्घात.

—::—

### स्वरप्रस्तार.

१. स रि ग म प ध नि ह्या सात स्वरांपैकीं एकपासून सात स्वरांपर्यंत कोणताही विवक्षित स्वरांचा पहिल्या स्वरापासून क्रम घेऊन त्यांतील स्वरांची उलटापालट करून नानातऱ्हेच्या स्वरांच्या रचना करणें व त्यांचे होतील तितके प्रकार तयार करून दाखविणें ह्यास **स्वरप्रस्तार** असें म्हणतात.

२. स्वरांच्या प्रस्तारांची संख्या काढण्याची रीति अशी आहेः——विवक्षित स्वरांच्या क्रमामध्यें जितके स्वर असतील तितक्या संख्येपर्यंत एकापासून क्रमिक अंकांचा गुणाकार करावा, जो गुणाकार येईल तितक्या संख्येइतके विवक्षित स्वरांच्या प्रस्ताराचे प्रकार होतील. उदाहरणार्थ, आपल्यास **स रि ग म** ह्या चार स्वरांचा प्रस्तार करावयाचा आहे असें समजा. एथें **स रि ग म** ह्या क्रमांत ४ स्वर आहेत, म्हणून दिलेल्या रीतीनें १×२×३×४=२४ इतके प्रकार **स रि ग म** ह्या चार स्वरांच्या प्रस्तारांचे झाले.

३. वर दिलेल्या रीतीनें:—

एक स्वराच्या प्रस्ताराचा प्रकार.... .... .... ....१,
दोन स्वरांच्या प्रस्तारांचे प्रकार .... .... ....१×२=२,
तीन ,, ,, ,, .... .... १×२×३=६,
चार ,, ,, ,, .... ....१×२×३×४=२४,
पांच ,, ,, ,, .... १×२×३×४×५=१२०,
सहा ,, ,, ,, ....१×२×३×४×५×६=७२०,
सात ,, ,, ,, १×२×३×४×५×६×७=५०४० होत.

४. ही रीति उत्तरमंद्रा ह्या एकाच मूर्छनेंतील विवक्षित क्रमांपैकीं स्वरांचा प्रस्तार करण्याची होय. सप्तस्वरांपैकीं पाहिजे त्या क्रमानें घेतलेल्या विवक्षित स्वरांचा प्रस्तार करणें झाल्यास ते अमुक वस्तूंपैकीं अमुक घेतल्या असतां त्यांच्या रचनांचे होणारे

जी अंकपाशाची रीति आहे ह्या रीतीप्रमाणें होतात. ती रीति प्रकार काढण्याची अशी—एकंदर वस्तूंच्या संख्यांकापासून जितक्या वस्तू घेतल्या असतील तितक्या संख्येपर्यंत उलट क्रमिक अंकांचा गुणाकार करावा. जो गुणाकार येईल तितके प्रकार विवक्षित वस्तूंच्या रचनांचे होतील. उदाहरणार्थ, सात वस्तूंपैकीं चार वस्तु घेतल्या असल्यास त्यांचे निरनिराळे रचनांचे प्रकार ७×६×५×४ = ८४० होतात.

५. ह्या रीतीप्रमाणें सप्तस्वरांपैकीं प्रत्येक खेपेस—

| | |
|---|---|
| कोणचाही एक स्वर घेतल्यास त्याचे रचनांचे प्रकार.... .... .... | ७=७, |
| कोणचेही दोन „ „ त्याचे „ „ .... .... .... | ७×६=४२, |
| „ तीन „ „ „ „ „ .... .... | ७×६×५=२१०, |
| „ चार „ „ „ „ „ .... .... | ७×६×५×४=८४०, |
| „ पांच „ „ „ „ „ .... | ७×६×५×४×३=२५२०, |
| „ सहा „ „ „ „ „ .... | ७×६×५×४×३×२=५०४०, |
| „ सात „ „ „ „ „ | ७×६×५×४×३×२×१=५०४० |

होतात.

६. विवक्षित स्वरांच्या प्रस्तारांतील रचनांचे सर्व प्रकार काढण्याची रीति अशी आहे. ज्या स्वरांचा प्रस्तार करावयाचा आहे ते स्वर विवक्षित मूळ क्रमानें लिहावे. हा प्रस्ताराचा पहिला प्रकार झाला. पुढचा प्रत्येक प्रकार पाठीमागच्या जवळच्या प्रकारावरून काढावयाचा असतो. पुढचे प्रकार काढतांना मागच्या प्रकारांतील पहिल्या स्वराच्या खालीं त्याच्या मागचा स्वर वरच्या क्रमांत पुढें आला नसेल तर तो पहिल्या स्वराचे स्थानीं लिहावा. तो स्वर पुढें आला असेल तर त्याच्या पाठीमागचा स्वर लिहावा. त्याच्या पाठीमागचा स्वरच नसेल तर तो स्वर सोडून त्याच्या पुढच्या स्वराविषयीं वर लिहिलेला विचार करून त्याच्या खालीं त्याच्या मागचा स्वर त्या क्रमांत पुढें आला नसल्यास तो लिहावा. तो पुढें आला असल्यास त्याच्या पाठीमागचा, तोही पुढें आला असल्यास त्याच्या पाठीमागचा, असें करीत करीत आतां त्याच्या पाठीमागचा स्वरच मूळ क्रमांत नाहीं असें झालें ह्मणजे तो स्वर टाकून त्याच्या पुढच्या स्वरावर जावें. ह्या रीतीनें दुसऱ्या क्रमांत एकादा स्वर खालीं लिहिला गेला ह्मणजे त्याच्या पुढें वरच्या क्रमांतील त्याच्या पुढचे सर्व स्वर जसेच्या तसे उतरून घ्यावे व त्या स्वराच्या पाठीमागें जागा रिकामी असल्यास तेथें जेवढे स्वर आतां ह्या रीतीनें दुसऱ्या क्रमांत लिहिले गेले असतील ते स्वर मूळच्या क्रमांत वर्ज्य करून बाकीचे स्वर अगदीं मूळच्या क्रमानेंच पाठीमागें लिहावे. असें करीत गेलें ह्मणजे दुसऱ्यापासून पुढचे प्रकार तयार होतील. शेवटीं जेव्हां प्रत्येक स्वर चाळून पाहतां त्याच्या मागचे सर्व स्वर पुढें आलेले आढळतील व त्याच्या खालीं मांडण्यास स्वरच मिळणार नाहीं तेथें प्रस्तार संपला असें समजावें.

७. ही रीति उदाहरणानें चांगली स्पष्ट ध्यानांत येईल. **स रि ग म** ह्या चार स्वरांचा प्रस्तार करावयाचा आहे असें समजा. ह्या चार स्वरांचा मूळचा जो विवक्षित ( १ ) **स रि ग म** हा क्रम तो पहिला प्रकार झाला. ह्या पहिल्या प्रकारावरून दुसरा प्रकार काढते वेळीं प्रथम **स** ह्या स्वराविषयीं असा विचार करावा कीं, ह्या स्वराच्या पाठीमागचा स्वर मूळ क्रमांत आहे कीं काय? मूळ क्रमांत 'स'च्या पाठीमागचा स्वरच नाहीं. तेव्हां तो स्वर सोडून देऊन पुढच्या स्वरावर जावें. पुढचा स्वर **रि** हा आहे. '**रि**'च्या मागचा स्वर **स** हा आहे व तो वरच्या क्रमांत '**रि**'च्या पुढें आलेला नाहीं, तेव्हां तो '**रि**'च्या खालीं मांडावा. आतां वरच्या क्रमांत '**रि**'च्या पुढें **ग म** हे दोन स्वर आहेत ते दुसऱ्या क्रमांत '**स**'च्या पुढें तसेच उतरून घ्यावे. ह्मणजे **स ग म** हे तीन स्वर मांडल्यासारिखे झाले. दुसऱ्या क्रमांत '**स**'च्या पाठीमागें एक स्वराची जागा राहिली आहे ती विचार करून मांडलेले जे **स ग म** हे स्वर ते मूळ क्रमांतील स्वरांतून काढून टाकून बाकी राहिलेला जो **रि** हा स्वर त्यानें भरून काढावी. म्हणजे ( २ ) **रि स ग म** हा दुसरा प्रकार झाला. तिसरा प्रकार ह्या दुसऱ्या प्रकारावरून काढावयाचा. दुसऱ्या प्रकारांत पहिला स्वर **रि** हा आहे. ह्याच्या पूर्वीचा स्वर **स** हा त्या क्रमांत पुढें आला आहे म्हणून तो टाकून व त्याच्या मागचा स्वर मूळांतच नाहीं म्हणून **रि** विषयीं विचार संपवून दुसरा स्वर जो **स** ह्याविषयीं तसा विचार करावा. '**स**'च्या पाठीमागचा स्वरच मूळ क्रमांत नाहीं म्हणून तोही सोडून पुढें तिसऱ्या स्वरावर गेलें पाहिजे. तिसरा स्वर **ग** हा आहे. त्याच्या पाठीमागचा स्वर **रि** हा त्याच्या पुढें त्या क्रमांत आलेला नाहीं. तेव्हां तो '**ग**'च्या खालीं लिहिला. पुढचा **म** हा स्वर '**रि**'च्या पुढें तसाच खालीं उतरून घेतला. बाकी राहिलेले **स ग** हे स्वर मूळच्या क्रमाप्रमाणें पाठीमागें लिहिले म्हणजे ( ३ ) **स ग रि म** हा तिसरा प्रकार तयार झाला. ह्याचप्रमाणें पुढचे सर्व प्रकार तयार करावे. ते सर्व मिळून २४ झाले पाहिजेत. कारण ४ स्वरांच्या प्रस्तारांची संख्या २४ होते असें आपण वर निश्चित केलेंच आहे. सरता ह्मणजे २४ वा प्रकार अगदीं पहिल्या प्रकाराच्या उलट म्हणजे ( २४ ) **म ग रि स** असा येतो. ह्याच्या पुढें आतां वर सांगितलेल्या रीतीप्रमाणें प्रस्तारच संभवत नाहीं. कारण पहिला स्वर जो **म** ह्याच्या मागचे स्वर क्रमानें **ग, रि, स,** हे सर्व त्या प्रकारांत पुढें आलेले आहेत. तसेंच '**ग**'च्या मागचे स्वर **रि** व **स**, व '**रि**'च्या मागचा स्वर **स** हे सर्व पुढें आहेत. तेव्हां ह्यांपैकीं कोणचाच स्वर खालीं मांडतां येत नाहीं. '**स**'च्या मागें तर स्वरच नाहीं. तेव्हां खालीं मांडण्यास स्वरच न मिळाल्यामुळें एथें प्रस्तार संपला.

८. ह्या रीतीनें **स** ह्या एक स्वराचा प्रस्तार—( १ ) **स** असा एकच होतो.

**स रि** ह्या दोन स्वरांच्या प्रस्तारांचे प्रकार—

( १ ) **स रि**, ( २ ) **रि स** असे २ होतात.

**स रि ग** ह्या तीन स्वरांच्या प्रस्तारांचे प्रकार—

| | | |
|---|---|---|
| (१) **स रि ग**, | (३) **स ग रि**, | (५) **रि ग स**, |
| (२) **रि स ग**, | (४) **ग स रि**, | (६) **ग रि स**, असे ६ होतात. |

स रि ग म ह्या चार स्वरांच्या प्रस्तारांचे प्रकार—

| | |
|---|---|
| (१) स रि ग म, | (१३) स ग म रि, |
| (२) रि स ग म, | (१४) ग स म रि, |
| (३) स ग रि म, | (१५) स म ग रि, |
| (४) ग स रि म, | (१६) म स ग रि, |
| (५) रि ग स म, | (१७) ग म स रि, |
| (६) ग रि स म, | (१८) म ग स रि, |
| (७) स रि म ग, | (१९) रि ग म स, |
| (८) रि स म ग, | (२०) ग रि म स, |
| (९) स म रि ग, | (२१) रि म ग स, |
| (१०) म स रि ग, | (२२) म रि ग स, |
| (११) रि म स ग, | (२३) ग म रि स, |
| (१२) म रि स ग, | (२४) म ग रि स, |

असे २४ होतात. ह्यांतील सरता प्रकार पहिल्याच्या अगदीं उलट आहे, व ओळीनें सहा सहा प्रकारांचा शेवटचा स्वर **म ग रि स** ह्या क्रमानें आलेला आहे हें लक्षांत ठेवावें.

९. ह्याचप्रमाणें पुढें पांच सहा व सात स्वरांच्या प्रस्तारांचे प्रकार विद्यार्थ्यांनीं स्वतः मांडून ह्या रीतीचा दृढ परिचय करून घ्यावा.

## खंडमेरु व नष्टोद्दिष्ट.

### खंडमेरु.

१०. वर दिलेले प्रस्ताराचे प्रकार, त्यांची एकपासून सात स्वरांपर्यंत प्रत्येक क्रमाची होणारी एकंदर संख्या, अमुक स्वरूपाच्या रचनेचा प्रकार कितवा व अमुकाव्या प्रकाराच्या रचनेचें स्वरूप कसें हें सर्व सुलभ रीतीनें जाणण्याकरितां शास्त्रकारांनीं एक प्रकारचें कोष्टक कल्पिलें आहे त्यास खंडमेरु असें म्हणतात.

११. खंडमेरु तयार करण्याची रीति अशी आहे.—

प्रथम खालीं दाखविल्याप्रमाणें आडव्या दोन समांतर रेषा काढून त्यांतील अवकाशाचीं सात घरें करावीं. नंतर डावेकडील पहिलें घर सोडून वरप्रमाणेंच त्याच्या खालीं सहा घरें करावीं व असेंच पुढें प्रत्येक खेपेस डावेकडील एक एक घर सोडून अगदीं कडेला शेवटीं एक घर येईपर्यंत घरें करून कोष्टक तयार करावें. किंवा पुढें दर्शविल्याप्रमाणें सात घरांचा समांतर चौकोन तयार करून त्याच्या कर्णानें व्यापलेलीं व कर्णाच्या उजवेकडील घरें कायम ठेवून बाकीचीं डावेकडील घरें पुसून टाकावीं, म्हणजे खंडमेरूचें कोष्टक तयार होतें.



१२. अशाप्रकारचें सात घरांपासून एक घरापर्यंत कोष्टक तयार केलें म्हणजे त्यांत खालीं लिहिल्याप्रमाणें आंकडे लिहून खंडमेरु तयार करावा.

प्रथम पहिल्या ओळीच्या पहिल्या घरांत १ चा आंकडा लिहून पुढें त्या ओळीच्या सर्व आडव्या घरांत शून्य लिहावें. दुसऱ्या ओळीच्या प्रत्येक घरांत पूर्वीच्या उभ्या ओळीतील खालच्या सरत्या घरांतील अंकांची बेरीज करून ती मांडावी. नंतर त्या संख्येस, तेथपासून खालीं जितकीं घरें असतील तितक्या संख्येनें प्रत्येक वेळेस गुणून तो गुणाकार खालच्या खालच्या घरांत मांडीत जावा. असें शेवटपर्यंत करावें म्हणजे खंडमेरु तयार होतो. आंकडे लिहून झाल्यानंतर कोष्टकाच्या अगदीं वरच्या बाजूस सात घरांच्यावर क्रमानें **स रि ग म प ध नि** हे सात स्वर लिहावे.

| स | रि | ग | म | प | ध | नि |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | ० | ० | ० | ० | ० | ० |
| | १ | २ | ६ | २४ | १२० | ७२० |
| | | ४ | १२ | ४८ | २४० | १४४० |
| | | | १८ | ७२ | ३६० | २१६० |
| | | | | ९६ | ४८० | २८८० |
| | | | | | ६०० | ३६०० |
| | | | | | | ४३२० |

१३. वरील नियमांप्रमाणें वरच्या कोष्टकांत पहिल्या ओळींतील पहिल्या घरांत १ मांडून पुढें सर्व घरांत शून्य मांडिलें. दुसऱ्या ओळींतील पहिल्या घरांत पूर्वींच्या सरत्या घरांतील संख्यांची बेरीज म्हणजे १ च मांडला. पुढें त्या ओळींतील दुसऱ्या घरांत पूर्वींच्या सरत्या घरांतील आंकड्यांची म्हणजे १ व १ यांची बेरीज २ ही मांडली. त्याच उभ्या ओळींतील त्याच्या खालच्या दुसऱ्या घरांत वरच्या दोन ह्या संख्येस त्या घराच्या संख्येनें म्हणजे २ नीं गुणून ४ मांडले. पुढें उभ्या चवथ्या ओळींत शून्याखालच्या पहिल्या घरांत पूर्वींच्या उभ्या ओळीच्या सरत्या घरांतील अंकांची संख्या म्हणजे १+१+४=६ मांडले. त्याच्या खालच्या दुसऱ्या घरांत ६×२=१२ व त्याच्या खालच्या तिसऱ्या घरांत ६×३=१८ मांडले. उभ्या पांचव्या ओळींत शून्याखालीं पहिल्या घरांत १+१+४+१८=२४, दुसऱ्या घरांत २४×२=४८, तिसऱ्या घरांत २४×३=७२, व चवथ्या घरांत २४×४=९६ मांडले. उभ्या ६ व्या ओळींत शून्याखालच्या पहिल्या घरांत १+१+४+१८+९६=१२० मांडून, पुढें खालच्या घरांत क्रमानें १२०×२=२४०, १२०×३=३६०, १२०×४=४८०, व १२०×५=६०० मांडले. तसेंच शेवटीं उभ्या ७ व्या ओळींत शून्याखालच्या पहिल्या घरांत १+१+४+१८+९६+६००=७२० मांडून पुढें खालच्या प्रत्येक घरांत क्रमानें ७२०×२=१४४०, ७२०×३=२१६०, ७२०×४=२८८०, ७२०×५=३६००, आणि ७२०×६=४३२० मांडिले ह्मणजे खंडमेरु संख्यांसह पूर्ण झाला. ह्यावरून नष्टोद्दिष्ट फार सुलभ रीतीनें काढितां येतात.

## नष्ट.

१४. स्वरप्रस्तारांपैकीं अमुकाव्या प्रकाराच्या स्वररचनेचें स्वरूप कसें ह्या प्रश्नाचें उत्तर देणें ह्यास नष्ट शोधून काढणें असें म्हणतात.

१५ नष्ट शोधून काढण्याचा प्रकार असा आहे:—जितक्या स्वरांच्या प्रस्तारांपैकीं नष्ट शोधून काढावयाचें असेल तितक्या स्वरांपर्यंतचें तितक्याच घरांचें खंडमेरूचें कोष्टक घेऊन त्या स्वरांचा मूळचा क्रम खंडमेरूच्या पहिल्या ओळीवर पहिल्या घरापासून प्रत्येक घरावर एक एक स्वर येईल अशा रीतीनें लिहावा. आतां वर लिहिलेल्या स्वरांखालच्या उभ्या ओळींतील घरांपैकीं ज्या घरांतील आंकड्यांची बेरीज नष्ट प्रकाराच्या संख्येइतकी होईल तीं घरें खुणा करून कायम करावीं. हीं घरें कायम करितांना आडव्या ओळींतील शून्याचें अगर आंकड्याचें कोणतें तरी एक एक घर असलेंच पाहिजे. मात्र उभ्या ओळींतील घरांपैकी प्रत्येक खेपेस कोणचेंही एकच घर घ्यावें, जास्त घेऊं नयेत. नंतर वर लिहिलेल्या क्रमाच्या शेवटच्या स्वरापासून त्या स्वराखालच्या उभ्या ओळींतील जें घर कायम केलें असेल त्या घरापर्यंत प्रत्येक घरास एकेक स्वराचा अवरोह करून जो स्वर येईल तो त्या घरीं लिहावा. हा नष्ट प्रकारापैकीं सरता स्वर झाला. हा स्वर मूळ क्रमांतून बाद करून बाकी राहिलेल्या क्रमाच्या शेवटच्या स्वरापासून वर लिहिल्याप्रमाणें अवरोह करून जो स्वर येईल तो कायम केलेल्या घरांत लिहावा व क्रमापैकीं तो स्वर कमी करावा. अवरोह करून निश्चित केलेला स्वर जर पूर्वीं मांडला असेल तर त्याच्या पुढें आणखी एक स्वराचा अवरोह करून तो



त्या घरांत लिहावा. तोही स्वर पूर्वीं लिहिला असेल तर त्याच्यापुढें आणखी एक स्वराचा अवरोह करून तो लिहावा. असें निराळा स्वर येईपर्यंत करावें. याप्रमाणें अगदीं पहिल्या स्वरापर्यंत केल्यानंतर पहिल्यापासून कायम केलेल्या घरांत लिहिलेल्या स्वरांचा क्रम पृथक् खालीं उतरून घ्यावा. हा इच्छित नष्ट प्रकारांच्या स्वररचनेचा क्रम झाला.

१६. उदाहरणार्थ, चार स्वरांच्या प्रस्तारांपैकीं २१ व्या प्रकाराची स्वररचना कशी आहे हें शोधून काढावयाचें आहे असें समजा. चार स्वरांच्या प्रस्तारांपैकीं प्रकार काढावयाचा आहे म्हणून खंडमेरूचें पहिल्यापासून चार घरांपर्यंतचें कोष्टक घ्या, व त्यांवर **स रि ग म** असे चार स्वर लिहा. ह्या कोष्टकांपैकीं ज्या घरांतील आंकड्यांची बेरीज २१ येईल तीं घरें खुणा करून कायम करा. घरें कायम करितांना आडव्या ओळींतील एक तरी घर घेतलेंच पाहिजे व उभ्या ओळींतील एकापेक्षां जास्त घर घ्यावयाचें नाहीं हें लक्षांत ठेवावें. एथें १+०+२+१८ ह्या चार आंकड्यांची बेरीज २१ होते म्हणून हीं घरें कायम केलीं. आतां शेवटच्या घरावर **म** हा स्वर आहे, तेथून १८ हा आंकडा चवथ्या घरांत आहे, म्हणून **म** पासून चार स्वरांचा अवरोह करून **स** हा येतो तो त्या घरांत मांडावा, व पहिल्या क्रमापैकीं **स** हा स्वर बाद करावा. आतां **रि ग म** हा तीन स्वरांचा क्रम राहिला, व तिसऱ्या घरावर पुनः **म** हा स्वर आला. तिसऱ्या घरांपैकीं २ चा आंकडा खालीं दुसऱ्या घरांत आहे म्हणून **म** पासून दोन स्वरांचा अवरोह करून **ग** स्वर आला तो त्या घरांत मांडिला, व मूळ क्रमांतील **ग** हा स्वर कमी केला. आतां **रि म** हा क्रम राहिला. दुसऱ्या घरांपैकीं शून्य हें पहिल्या घरांत आहे म्हणून अवरोह न करितां **म** हा स्वर त्या घरांत तसाच लिहिला, व तो मूळ क्रमांतून काढून टाकिला. शेवटीं **रि** हा स्वर राहिला. तो पहिल्या घरांत १ चे आंकड्याजवळ लिहिला. तेव्हां **रि म ग स** असा नवीन क्रम निष्पन्न झाला. ही २१ व्या नष्ट प्रकाराची स्वररचना होय. हें खालीं चार घरांचें खंडमेरूचें कोष्टक घेऊन स्पष्ट करून दाखविलें आहे.

मूळ क्रमांतील स्वराच्या खालच्या घरापर्यंत अवरोह करून आलेला स्वर जर पूर्वीं मांडला असेल तर तो स्वर सोडून त्याच्या पुढें निराळा स्वर येईपर्यंत स्वराचा अवरोह करून तो स्वर मांडावा.

| स | रि | ग | म | (मूळ क्रम) |
|---|---|---|---|---|
| १ रि | ० म | ० | ० | |
| | १ | २ ग | ६ | |
| | | ४ | १२ | |
| | | | १८ स | |

१ + ० + २ + १८ = २१ नष्टक्रमसंख्या.

**रि**   **म**   **ग**   **स** .... नष्ट प्रस्ताराचा क्रम.

## उद्दिष्ट

१७. इच्छित स्वरांच्या प्रस्तारांतील अमुक स्वरूपाच्या स्वररचनेचा प्रकार कितवा ह्या प्रश्नाचें उत्तर देणें ह्यास उद्दिष्ट सांगणें असें म्हणतात.

१८. उद्दिष्ट सांगण्याची रीति नष्ट शोधून काढण्याच्या कृतीच्या उलट आहे. ती रीति अशीः—उद्दिष्ट स्वरांच्या संख्येइतक्या घरांचें खंडमेरूचें कोष्टक घेऊन दिलेल्या स्वररचनेच्या प्रकाराचे स्वर क्रमानें खंडमेरूच्या पहिल्या ओळीच्या वर पहिल्या घरापासून प्रत्येक घरावर एकेक स्वर येईल अशा रीतीनें लिहावे, व त्यांच्या खालीं बारीक अक्षरांनीं मूळ क्रमाचे स्वरही लिहावे. नंतर दिलेल्या स्वररचनेचा शेवटचा स्वर हा मूळ क्रमाच्या शेवटच्या स्वरापासून पाठीमागें कितवा येतो हें पाहून त्या स्वराच्या खालच्या ओळींत वरपासून घरें मोजून तितकें घर कायम करावें व मूळ क्रमांतून व दिलेल्या स्वररचनेंतून तो स्वर बाद करावा. पुढें शेवटापासून दुसऱ्या तिसऱ्या वगैरे स्वरांचीं घरें अशाच रीतीनें कायम करावीं. नंतर कायम केलेल्या घरांतील संख्यांची बेरीज करावी. ही दिलेल्या प्रकारच्या स्वररचनेची उद्दिष्ट संख्या झाली.

१९. उदाहरणार्थ, चार स्वरांच्या प्रस्तारांपैकीं **म रि ग स** हा प्रकार कितवा आहे हें सांगावयाचें आहे असें समजा. चार स्वरांच्या प्रस्तारांपैकीं हा प्रकार असल्या कारणानें खंडमेरूचें पहिल्या चार घरांचें कोष्टक घेऊन त्या घरांवर **म रि ग स** हे चार स्वर क्रमानें लिहिले. त्यांच्या खालीं मूळ क्रमानें **स रि ग म** हेही चार स्वर लिहावे. आतां दिलेल्या क्रमांतील **स** हा शेवटचा स्वर मूळ क्रमांतील शेवटचा स्वर जो **म** त्याच्यापासून पाठीमागें अवरोह करून चवथा येतो तो वरपासून चवथ्या घरांत म्हणजे १८ चा आंकडा ज्या घरांत आहे त्या घरांत लिहिला, व मूळ क्रमांतील **स** हा स्वर बाद केला. आतां मूळ क्रम **रि ग म** असा राहिला. दिलेल्या क्रमांतील **ग** हा दुसरा स्वर मूळ क्रमांतील शेवटचा स्वर जो **म** त्यापासून अवरोह केल्यास दुसरा होतो तेव्हां तो दुसऱ्या घरांत म्हणजे २ हा आंकडा ज्या घरांत आहे त्या घरांत मांडला व मूळ क्रमांतील **ग** हा स्वर कमी केला. आतां मूळ क्रम **रि म** असा राहिला. दिलेल्या क्रमांतील **रि** हा तिसरा स्वर राहिलेल्या मूळ क्रमांतील शेवटचा स्वर जो **म** त्यापासून अवरोह करून तिसरा येतो. पण एथें तिसरें घरच नाहीं, म्हणून खालच्या शेवटच्या घरांत म्हणजे १ चा आंकडा असलेल्या घरांत मांडला, व **रि** हा स्वर मूळ क्रमांतून बाद केला. आतां मूळ क्रमांत फक्त **म** हा स्वर राहिला. दिलेल्या क्रमांतील राहिलेला पहिला स्वरही **म**च आहे तेव्हां अवरोह वगैरे न करितां पहिल्या घरांत १ च्या आंकड्याशेजारीं **म** हा स्वर मांडिला. आतां पहिल्यापासून स्वर कायम करून मांडिलेल्या घरांतील आंकड्यांची बेरीज १+१+२+१८=२२ येते. तेव्हां **म रि ग स** हा उद्दिष्ट क्रम २२ वा होय. हें सर्व खालच्या कोष्टकांत स्पष्ट करून दाखविलें आहे.



प रि ग स........( उद्दिष्ट क्रम )
स रि ग म........( मूळ क्रम )

| | | | |
|---|---|---|---|
| १ म | ० | ० | ० |
| | १ रि | २ ग | ६ |
| | | ४ | १२ |
| | | | १८ स |

म रि ग स .... उद्दिष्ट क्रम.
१ + १ + २ + १८ = २२ उद्दिष्ट क्रमसंख्या.

२०. खंडमेरूच्या कोष्टकावरून तानांची संख्याही काढितां येते. जितक्या स्वरांच्या तानांची संख्या काढावयाची असेल त्यांतील शेवटचा स्वर घेऊन खंडमेरूच्या कोष्टकांत त्या स्वराच्या खालीं असलेल्या आंकड्यांच्या घरांपैकीं शून्याचें घर टाकून पहिल्या व शेवटच्या घरांतील आंकड्यांची बेरीज करावी. जी बेरीज येईल ती तितक्या स्वरांच्या तानांची संख्या झाली. उदाहरणार्थ—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ग | पर्यंतच्या | ३ | स्वरांच्या | तानांची | संख्या | २ + ४=६ |
| म | ,, | ४ | ,, | ,, | ,, | ६ + १८=२४ |
| प | ,, | ५ | ,, | ,, | ,, | २४ + ९६=१२० |
| ध | ,, | ६ | ,, | ,, | ,, | १२०+ ६००=७२० |
| नि | ,, | ७ | ,, | ,, | ,, | ७२०+४३२०=५०४० |

किंवा शेवटच्या स्वराच्या खालीं असलेल्या घरांपैकीं सरत्या घरांतील व त्यांच्या पाठीमागच्या घरांपैकीं शेवटच्या सर्व घरांतील आंकड्यांची बेरीज करावी, जी बेरीज येईल ती विवक्षित स्वरांच्या तानांची संख्या होईल. उदाहरणार्थ—

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| स | पर्यंतच्या | १ | स्वराच्या | तानांची | संख्या | .... .... .... .... १=१ |
| रि | ,, | २ | स्वरांच्या | ,, | ,, | .... .... .... ....१+१=२ |
| ग | ,, | ३ | ,, | ,, | ,, | .... .... ....१ +१+४ =६ |
| म | ,, | ४ | ,, | ,, | ,, | .... .... ....१+१+४+१८=२४ |
| प | ,, | ५ | ,, | ,, | ,, | ..... ....१+१+४+१८+९६=१२० |
| ध | ,, | ६ | ,, | ,, | ,, | ....१+१+३+१८+९६+६००=७२० |
| नि | ,, | ७ | ,, | ,, | ,, | १+१+४+१८+९६+६००+४०२०=५०४० |

## स्वरांविषयीं विशेष विचार.

२१. हल्लीं महाराष्ट्रांत व उत्तर हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या स्वरसप्तकाचा श्रुतिनिश्चय करणें झाल्यास तो खालीं लिहिल्याप्रमाणें करितां येईल. स रि ग म प ध नि ह्या सात स्वरांपैकीं षड्ज व पंचम हे अविकृत आहेत, व मध्यम कोमल मानिला आहे; बाकीचे सर्व स्वर तीव्र मानिले आहेत. ह्मणजे पंचम, ऋषभ व धैवत हे चार चार श्रुतींचे, गांधार व निषाद तीन तीन श्रुतींचे व षड्ज व मध्यम हे दोन दोन श्रुतींचे होतात.

२२. पाश्चात्यांचे सध्यां प्रचारांत असलेले सप्त स्वरही बहुतेक अंशीं असेच आहेत. ते ह्या स्वरांमधील अंतरें श्रुतींचीं न मानितां स्वरांचींच मानितात. त्यांनीं षड्जापासून ऋषभापर्यंतचें अंतर एक स्वराचें, ऋषभापासून गांधारापर्यंत पुनः एक स्वराचें, गांधारापासून मध्यमापर्यंत अर्ध्या स्वराचें, मध्यमापासून पंचमापर्यंत एक स्वराचें, तसेंच पंचमापासून धैवतापर्यंत एक स्वराचें, धैवतापासून निषादापर्यंत एक स्वराचें, व निषादापासून पुढच्या षड्जापर्यंत अर्ध्या स्वराचें अंतर मानिलें आहे. ह्मणजे त्यांच्या मतीं मध्यम व षड्ज यांच्या जवळचें अंतर अर्ध्या स्वराचें व इतर स्वरांचीं अंतरें एक एक स्वराचीं आहेत. त्यांचें एक स्वराचें अंतर आपल्या ४ श्रुतींच्या अंतराबरोबर आहे, व अर्ध्या स्वराचें अंतर २ श्रुतींबरोबर आहे असें दिसतें. प्रचारांतील सप्तस्वरांचीं आपलीं श्रुतींचीं व पाश्चात्यांचीं स्वरांचीं अंतरें खालीं दाखविलीं आहेत.

(श्रुतीचें अंतर) स ४ रि ३ ग २ म ४ प ४ ध ३ नि २ सं

(स्वराचें अंतर) C १ D १ E ½ F १ G १ A १ B ½ C

२३. ह्या रीतीनें पाहिलें तर आपले स्वर व पाश्चात्यांचे स्वर बहुतेक सारखेच आहेत. फक्त रिपासून गपर्यंत व धपासून निपर्यंत आपलें तीन तीन श्रुतींचें अंतर आहे तेथें त्यांचें एक स्वराचें ह्मणजे चार श्रुतींचें अंतर आहे. एवढाच काय तो फरक आहे. ही त्यांची व्यवस्था मानीव आहे. त्याला श्रुतीचें ह्मणजे ध्वनिशास्त्राचें किंवा गणिताचें वगैरे कोणचेंच प्रमाण सध्या चांगलेंसें बसत नाहीं, हें त्यांच्याच ग्रंथकारांनीं कबूल केलें आहे. ह्या सप्तस्वरांच्या ग्रामास मेजर स्केल अशी त्यांची संज्ञा आहे.

२४. ह्यावरून एक स्वराच्या अंतरानें निष्पन्न होणारे स्वर ह्मणजे तीव्र स्वर व अर्ध्या स्वराच्या अंतरानें होणारे स्वर ते कोमल स्वर असें त्यांनीं मानिलें आहे. ह्या अंतरांची व तीव्र कोमलाची व्यवस्था त्यांच्या ज्या स्वरग्राधाच्या पेट्या येतात त्यांत पांढऱ्या व काळ्या पड्यांनीं स्पष्ट दाखविली असते. ती अशी—

मंद्र सप्तक. मध्य सप्तक. तार सप्तक.

ह्यांतील काळ्या पड्या कोमल स्वरांच्या व पांढऱ्या पड्या तीव्र स्वरांच्या होत. काळ्या पड्या २, ३, २, ३, २, ह्या क्रमानें येतात हें स्पष्ट दिसेल. एका षड्जापासून त्याच्या दुपटीच्या षड्जापर्यंत ७ पांढऱ्या पड्या ह्मणजे ७ पूर्ण किंवा तीव्र स्वर व ५ काळ्या पड्या ह्मणजे ५ अर्धे स्वर किंवा कोमल स्वर मिळून १२ स्वर होतात. ह्या १२ स्वरांच्या अशा प्रकारच्या रचनेस क्रोमाटिक स्केल अशी संज्ञा आहे.

२५. शुद्ध, कोमल व तीव्र मिळून आपले प्रचारांतील १२ स्वर आणि पाश्चात्यांचें क्रोमाटिक स्केलचे १२ स्वर व त्यांच्या मधील श्रुतींचीं व स्वरांचीं अंतरें एणेप्रमाणें आहेत:—

| स्वर. | श्रुतींचें अंतर. | स्वरांचें अंतर. | | स्वर. | श्रुतींचें अंतर. | स्वरांचें अंतर. | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| स ( शु.)............ | २, C | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | प ( शु. )........... | २, G | $\frac{१}{२}$ | १ |
| रि् ( को.)............ | २, D b | $\frac{१}{२}$ | | ध् (को. )........... | २, A b | $\frac{१}{२}$ | |
| रि( ती. )............ | २, D # | $\frac{१}{२}$ | १ | ध ( ती. )........... | २, A # | $\frac{१}{२}$ | १ |
| ग् ( को.)............ | १, E b | $\frac{१}{२}$ | | नि् (को.)........... | १, B b | $\frac{१}{२}$ | |
| ग ( ती.)............ | २, E # | $\frac{१}{२}$ | १ | नि( ती. )........... | २, B # | $\frac{१}{२}$ | १ |
| म् ( को. )..... ...... | २, F b | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ | सं ( शु. )........... | २, C' | $\frac{१}{२}$ | $\frac{१}{२}$ |
| म ( ती.)............ | २, F # | $\frac{१}{२}$ | | | | | |

२६. प्रचारांतील सप्तस्वरांमध्यें गणिताचें प्रमाण पाहूं गेल्यास षड्ज हा १ कल्पून इतर स्वरांचें सापेक्ष प्रमाण खालीं लिहिल्याप्रमाणें आढळतें.

| | | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| आपले स्वर... | स | : | रि | : | ग | : | म | : | प | : | ध | : | नि | : | सं |
| पाश्चात्यांचे स्वर | C | : | D | : | E | : | F | : | G | : | A | : | B | : | C |
| प्रमाण ...., .... | १ | : | $\frac{९}{८}$ | : | $\frac{५}{४}$ | : | $\frac{४}{३}$ | : | $\frac{३}{२}$ | : | $\frac{५}{३}$ | : | $\frac{१५}{८}$ | : | २ |
| ह्मणजे(पूर्णांकांत) | २४ | : | २७ | : | ३० | : | ३२ | : | ३६ | : | ४० | : | ४५ | : | ४८ |
| किंवा........ | २४० | : | २७० | : | ३०० | : | ३२० | : | ३६० | : | ४०० | : | ४५० | : | ४८० |

हें सरतें प्रमाण स्वरांच्या सापेक्ष लहरींचें प्रमाण मानिलें आहे. हेंच प्रमाण ३६ इंचांची तार घेऊन ती मंद्र षड्ज स्वरांत लाविली तर इतर स्वरांचे ठिकाणीं इंचांचें सापेक्ष प्रमाण असें येतें:—

| | | | | | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स | : | रि | : | ग | : | म | : | प | : | ध | : | नि | : | सं |
| ३६ | : | ३२ | : | २८$\frac{४}{५}$ | : | २७ | : | २४ | : | २१$\frac{३}{५}$ | : | १९$\frac{१}{५}$ | : | १८ |

२७. ह्या प्रमाणांवरून षड्जाच्या सवाईनें गांधार, दिढीनें पंचम् व दुपटीनें वरचा षड्ज असतो, व मध्यम तिजाईनें जास्त असतो हें निष्पन्न होतें. तसेंच गांधाराच्या दिढीनें निषाद व मध्यमाच्या दिढीनें वरचा षड्ज, वरच्या षड्जाच्या पाउणपटीनें पंचम्; पंचमाच्या पाउणपटीनें ऋषभ, व धैवताच्या पाउणपटीनें गांधार असतो हेंही स्पष्ट दिसतें.

२८. कर्णाटकांत सध्या प्रचारांत असलेले सप्तस्वर आपल्या सप्तस्वरांहून थोडेसे

भिन्न आहेत. त्यांचा ऋषभ व धैवत शुद्ध आहे, एवढाच काय तो फरक आहे, बाकीचे सर्व स्वर आपल्या स्वरांप्रमाणें आहेत. त्यांच्या सप्तस्वरांच्या संज्ञा व श्रुति-निश्चय खालीं लिहिल्यांप्रमाणें आहेत:—

| स्वर. | श्रुति. | स्वर. | श्रुति. |
|---|---|---|---|
| षड्ज .... | .... ४ | पंचम .... | .... ४ |
| ( शुद्ध ) ऋषभ .... | .... ३ | ( शुद्ध ) धैवत .... | .... ३ |
| ( अंतर ) गांधार .... | .... ४ | (काकली) निषाद | .... ४ |
| ( शुद्ध ) मध्यम .... | .... २ | षड्ज.... | .... २ |
| | १३ | | १३ |

√ २६

२९. रागांचें स्वरूप पूर्णतेनें दाखविण्याकरितां शुद्ध व विकृत स्वर मिळून कर्णाटकांत हल्लीं १६ स्वर मानितात. ह्या १६ स्वरांच्या संज्ञा व श्रुति खालीं लिहिल्या आहेत:—

| | स्वरांच्या संज्ञा. | श्रुति. | | स्वरांच्या संज्ञा. | श्रुति. |
|---|---|---|---|---|---|
| १ षड्ज | अविकृत | ४ | १ पंचम | अविकृत. | २ |
| ३ ऋषभ | १ शुद्ध ऋ. | ३ | ३ धैवत | १ शुद्ध धै. | ३ |
| | २ चतुःश्रुति ऋ. | १ | | २ चतुःश्रुति धै. | १ |
| | ३ षट्श्रुति ऋ. | १ | | ३ षट्श्रुति धै. | १ |
| ३ गांधार | १ शुद्ध गां. | ० | ३ निषाद | १ शुद्ध नि. | ० |
| | २ साधारण गां. | १ | | २ कैशिकी नि. | १ |
| | ३ अंतर गां. | १ | | ३ काकली नि. | १ |
| २ मध्यम | १ शुद्ध म. | २ | ७ स्वर | | श्रुति ९ |
| | २ प्रति म. | २ | | | |
| ९ स्वर | | श्रुति १५ | | | |

एकुण स्वर १६, व श्रुति २४.

## शुद्ध व विकृत स्वर.

३०. शुद्ध व विकृत स्वर मिळून सध्या प्रचारांत स्थूल मानानें १२ स्वरांवर निर्वाह केलेला आढळतो, असें पूर्वी पहिल्या पुस्तकांत सांगितलें आहे. परंतु कित्येक



रागांचें स्वरूप स्पष्ट शुद्ध व पूर्णतेनें दाखवावयाचें म्हटलें ह्मणजे याहीपेक्षां जास्त विकृत स्वर मानिल्याखेरीज गत्यंतर नाहीं. संगीत-रत्नाकरकार व दर्पणकार ७ शुद्ध व १२ विकृत स्वर मिळून एकंदर १९ स्वर मानितात, रागविबोधकार ७ शुद्ध व १५ विकृत मिळून २२ स्वर मानितात व संगीत-पारिजातकार ७ शुद्ध व २२ विकृत मिळून एकंदर २९ स्वर मानितात.

३१. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं निरनिराळे विकृत स्वर मानिले आहेत त्या सर्वांचें सूक्ष्म रीतीनें पर्यालोचन केलें ह्मणजे अशीं भिन्न मतें होण्याचें कारण काय हें स्पष्ट कळून येतें. ग्रंथकारांनीं विकृत स्वर दोन प्रकारचे मानिले आहेत: ( १ ) स्वतःसिद्ध विकृत व ( २ ) सापेक्ष विकृत. शास्त्रांत सांगितलेल्या श्रुति टाकून पुढच्या किंवा मागच्या श्रुतीवर अभिव्यक्त होणारे स्वर ते स्वतःसिद्ध विकृत होत, व दोन स्वरांमध्यें जें अंतर सांगितलें आहे तें अंतर कमी जास्त केल्यानंतरही जे स्वर आपल्या निश्चित श्रुतीवर अभिव्यक्त होतात ते सापेक्ष विकृत होत. पहिल्या प्रकारचे विकृत स्वर समजण्याचें कांहीं कठिण नाहीं. परंतु दुसऱ्या प्रकारचे ह्मणजे सापेक्ष विकृत स्वर ह्मणजे काय हें त्वरित ध्यानांत येणें तितकें सुलभ नाहीं. याकरितां तें उदाहरणें घेऊन स्पष्ट करून दाखविलें पाहिजे. शुद्ध ऋषभ स्वर सातव्या श्रुतीवर व शुद्ध गांधार स्वर नवव्या श्रुतीवर अभिव्यक्त होतो, ह्मणजे ऋषभ व गांधार ह्या दोन स्वरांमधील अंतर दोन श्रुतींचें आहे. आतां ऋषभाची एक श्रुति कमी करून तो दोन श्रुतींचा ह्मणजे कोमल केला तर त्याची शास्त्रांत सांगितलेली नियमित श्रुति सुटल्यामुळें तो विकृत झाला. हें त्याचें विकृतत्व दुसऱ्या कोणावरही अवलंबून नसल्यामुळें स्वतःसिद्ध विकृतत्व होय. पण ऋषभाची एक श्रुति कमी झाल्यामुळें ऋषभ व गांधार ह्यांमधील अंतर तीन श्रुतींचें झालें. ह्या वेळेस अशा प्रकारचा ऋषभ व गांधार एकामागून एक असे उच्चारल्यास मनावर जो परिणाम होईल तो पूर्वीचे शुद्ध स्वर उच्चारल्यानंतर जो परिणाम होत होता त्याहून अगदीं भिन्न होईल हें उघड आहे. ह्मणजे गांधाराचें उच्चारण देखील भिन्न भासूं लागेल. हें जें गांधाराच्या उच्चाराचें तो नवव्याच श्रुतीवर अभिव्यक्त होत असतांना विकृत ऋषभाच्या जोडगणीनें भिन्न भासणें ह्यासच सापेक्ष विकृतत्व असें म्हणतात. ह्यावरून पूर्वीच्या ग्रंथकारांनीं स्वर शुद्ध असतांनाही अच्युत षड्ज अच्युत मध्यम वगैरे विकृत स्वरांचे भेद मानिले आहेत त्याचा उलगडा केव्हांच होतो व विकृत स्वरांविषयीं ग्रंथकारांचा मतभेद तरी कां होतो हेंही स्पष्ट कळून येतें.

३२. निरनिराळ्या ग्रंथकारांनीं मानिलेले शुद्ध व विकृत स्वर, व महाराष्ट्रांत व उत्तर हिंदुस्थानांत, कर्णाटकांत व पाश्चिमात्य राष्ट्रांत सध्या प्रचलित असलेले शुद्ध व विकृत स्वर हे सर्व खालीं दिलेल्या कोष्टकांत दाखविले आहेत. त्याचप्रमाणें रागांचें स्वरूप पूर्ण शुद्ध व स्पष्ट दाखविण्याकरितां व सर्व प्रकारच्या गाण्यांचा संग्रह करितां यावा ह्मणून आपल्यास सध्या शुद्ध व विकृत स्वर मिळून कमींत कमी किती स्वर मानिले पाहिजेत तेंही शेवटच्या रकान्यांत नमूद केले आहेत.

## शुद्ध व विकृत स्वरांचें कोष्टक.

| श्रुति. | शुद्ध स्वर. | | विकृत स्वर. | | | | | शुद्ध व विकृत स्वर | मुख्य व गौण स्वर | | शुद्ध व विकृत स्वर |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | रागविबोध. | | संगीत-पारिजात. | | आधुनिक प्रचार. | | | |
| | षड्ज ग्राम | मध्यम ग्राम | संगीतरत्नाकर व संगीतदर्पण. | शास्त्रोक्त | देशी लक्ष्य | कोमल | तीव्र | महाराष्ट्र व उ० हिंदुस्थान | कर्णाटक | पाश्चात्य राष्ट्रें. | स्वसंमत. |
| १ | | | ११ कैशिकी निषाद | ६ कैशिकी नि. | १२षट्श्रुतिधै. १३ कै. नि. | | २० तीव्र नि. | | १४ षट्श्रु. धै. १५कैशि. नि. | | १५ तीव्र निषाद. |
| २ | | | १२ काकली निषाद | ७ काकली नि. | १४ काकली नि. | | २१ तीव्रतर नि. | १२ तीव्र नि. | १६ काकली निषाद. | १२नि. (तीव्र) ( शार्प ) | १६ तीव्रतर निषाद |
| ३ | | | १ च्युत षड्ज | १ च्युत षड्ज मृदु स. | १५ मृदु षड्ज | ( मृदु स. ) | २२ तीव्रतम नि. | | | | |
| ४ | स | स | २ अच्युत षड्ज | (स) | | | | १ स (शुद्ध) | १ स (शुद्ध) | १ स. | १ स. |
| ५ | | | | | | १ पूर्व रि. | | | | | २ अतिकोमल ऋषभ |
| ६ | | | | | | २ कोमल रि. | | २ कोमल रि. | | २ रि. (को.) (फ्लॅट) | ३ कोमल ऋषभ |
| ७ | रि | रि | ३ चतुःश्रुति ऋषभ | (रि) | | ३ पूर्व गां. | | | २ शुद्ध रि | | ( शुद्ध ऋषभ ) (क.) |
| ८ | | | | | १ चतु. रि. (तीव्र) | ४ कोमल गां. | ५ तीव्र रि. | ३ तीव्र रि. | ३ चतुःश्रुति रि. | ३ रि. (तीव्र) ( शार्प ) | ४ तीव्र ऋषभ. |
| ९ | ग | ग | | (ग) | २ पंचश्रु. रि. (तीव्रतर) | | ६ तीव्रतर रि. | ४ कोमल गां. | ४ शुद्ध गां. | ४ ग (कोमल) (फ्लॅट) | ५ कोमल गांधार |
| १० | | | ४ त्रिश्रुति गां. (साधारण गां.) | ३ साधारण गांधार तीव्र गां. | ३षट्श्रु. रि. (तीव्रतम) ४साधा० गां. | | ७ तीव्र गां. | | ५ षट्श्रु. रि. ६ साधा. गां. | | ६ तीव्र गांधार |
| ११ | | | ५ चतुःश्रु. गां. (अंतर गां.) | ३ अंतर गां. तीव्रतर गां. | ५ अंतर गां. (तीव्रतर गां.) | | ८ तीव्रतर गां. | ५ तीव्र गां. | ७ अंतर गां. | ५ ग (तीव्र) (शार्प) | ७ तीव्रतर गांधार |
| १२ | | | ६ च्युत मध्यम | ४ मृदु मध्यम (गांधारभेद) | ६ मृदु मध्यम | (मृदु मध्यम) | ९ तीव्रतम गां. | | | | |
| १३ | म | म | ७ अच्युत मध्यम | (म) | ७ षट्श्रु. गां. (तीव्रतम) | | १० अति तीव्रतम गांधार | ६ कोमल म. | ८ शुद्ध मध्यम | ६ म (को.) (फ्लॅट.) | ८ कोमल मध्यम |
| १४ | | | | | | | ११ तीव्र म. | | | | |
| १५ | | | | | ८ षट्श्रु. म. (तीव्रतम म.) | | १२ तीव्रतर मध्यम | ७ तीव्र म. | ९ प्रति मध्यम | ७ म (ती.) (शार्प) | ९ तीव्र मध्यम |
| १६ | | प | ८ त्रिश्रुति पंचम | ५ मृदु पं. (मध्यमभेद) | ९ मृदु पंचम | (मृदु पंचम) | १३ तीव्रतम मध्यम | | | | |
| १७ | प | | ९ चतुःश्रुति पंचम | (प) | | | | ८ प (शुद्ध) | १० प (शुद्ध) | ८ प | १० प |
| १८ | | | | | | १४ पूर्व धैवत | | | | | ११ अति कोमल धै. |
| १९ | | | | | | १५ कोमल धैवत | | ९ कोमल धै. | | ९ ध. (को.) (फ्लॅट.) | १२ कोमल धैवत |
| २० | ध | ध | १० चतुःश्रुति धैवत. | (ध) | | १६ पूर्व नि. | | | ११ शुद्ध धै. | | ( शुद्ध धैवत ) (क.) |
| २१ | | | | | १० चतुःश्रुति धैवत | १७ कोमल नि. | १८ तीव्र धै. | १० तीव्र धै. | १२ चतुःश्रुति धैवत | १० ध (ती.) (शार्प) | १३ तीव्र धैवत. |
| २२ | नि | नि | | (नि) | ११ पंचश्रुति धैवत | | १९ तीव्रतर धैवत | ११ कोमल नि. | १३ शुद्ध नि. | ११ नि. (को.) (फ्लॅट) | १४ कोमल निषाद |

३३. वरील कोष्टकांत प्रथम श्रुतींच्या आंकड्यांपुढें शुद्ध स्वर दाखवून पुढें वि-
कृत स्वर दाखविले आहेत. शुद्ध स्वरांच्या सदराखालीं षड्जग्राम व मध्यमग्राम असे
दोन ग्राम दाखविले आहेत. षड्जग्रामांत पंचम ४ श्रुतींचा असून १७ व्या श्रुतीवर
अभिव्यक्त होतो, व मध्यम ग्रामांत तो ३ श्रुतींचाच असून १६ व्या श्रुतीवर अभि-
व्यक्त होतो एवढाच काय तो ह्या दोन ग्रामांमध्यें फरक आहे. बाकीचे सर्व स्वर दोनी
ग्रामांत शास्त्रांत दिलेल्या श्रुतींवरच अभिव्यक्त होतात.

३४. संगीतरत्नाकर व संगीतदर्पण ह्यांच्या मतांप्रमाणें दिलेल्या विकृत स्वरां-
पैकीं अच्युत षड्ज, चतुःश्रुति ऋषभ, अच्युत मध्यम, चतुःश्रुति पंचम व चतुःश्रुति
धैवत ह्मणजे २, ३, ७, ९ व १० हे ५ स्वर सापेक्ष विकृत आहेत, व बाकीचे ७ स्वर
स्वतःसिद्ध विकृत आहेत हें अगदीं उघड आहे.

३५. हेच ७ स्वतःसिद्ध विकृत स्वर फक्त विकृत होऊं शकतात, व इतर ५ स्वर क्रमानें
**स रि म प ध** ह्या पांच शुद्ध स्वरांशीं समध्वनि असल्याकारणानें ते विकृत होऊं शकत
नाहींत असें रागविबोधकाराचें मत आहे; व ते ७ स्वतःसिद्ध विकृत स्वर त्याच्या शास्त्रोक्त
विकृत स्वरांच्या सदराखालीं दाखविले आहेत. ह्यावरून रागविबोधकार सापेक्ष विकृत स्वर
मानीत नाहीं हें स्पष्ट दिसतें. देशी लक्ष्याच्या सदराखालीं त्यानें दिलेले विकृत स्वर हे
सर्व स्वतःसिद्ध विकृत आहेत हें निराळें सांगावयास नको. ह्या स्वरांत देखील पंचश्रुति व
षट्श्रुति ऋषभ व धैवत आणि षट्श्रुति गांधार हे स्वर क्रमानें गांधार व निषाद आणि
मध्यम ह्यांच्या प्रदेशांत जात असल्या कारणानें त्यांच्या संज्ञा देशी लक्ष्यांच्या अ-
नुरोधानें वर्ज्यावर्ज्य पाहून निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या मानाव्या. असें त्यानें ध्व-
नित केलें आहे; व ह्या तत्त्वास अनुसरूनच त्यानें आपलीं मेळांचीं व रागांचीं लक्षणें
दिलीं आहेत.

३६. संगीतपारिजातकार अहोबल पंडित ह्यानें तर २२ विकृत स्वर मानिले आ-
हेत, व त्या सर्व विकृत स्वरांना निरनिराळीं नांवें देण्याकरितां मृदु, पूर्व, कोमल, तीव्र,
तीव्रतर, तीव्रतम, अतितीव्रतम ह्या सर्व संज्ञा सररास प्रचारांत आणिल्या आहेत. रत्नाकर-
काराच्या वेळच्या च्युत, अच्युत, त्रिश्रुति, चतुःश्रुति वगैरे विकृत स्वरांच्या पूर्वींच्या
संज्ञा ह्याच्या वेळेस अगदीं लुप्तप्राय झाल्याशा दिसतात. ह्या पारिजातकाराच्या संज्ञा अगदीं
अलीकडच्या असल्या कारणानें ह्यांच्यापैकीं बऱ्याच संज्ञा प्रचारांत सध्यां चालू आहेत.
इतके विकृत स्वर कंठांतून काढून गाणें बजावणें बिनचूक करणें सामान्य जनांस शक्य
नसल्याकारणानें त्यांनीं त्यांचा संकोच करीत करीत सध्या शुद्ध व विकृत स्वरांची म-
जल १२ स्वरांवर आणून ठेविली आहे असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

३७. आधुनिक प्रचाराच्या सदराखालीं महाराष्ट्रांत व उत्तर हिंदुस्थानांत प्रचलित
असलेले शुद्ध व विकृत स्वर मिळून दिलेले १२ स्वर, व पाश्चात्य राष्ट्रांत सध्या चालू
असलेले मुख्य व गौण स्वर मिळून होणारे १२ स्वर, तसेंच कर्णाटकांत मानिलेले १६
स्वर, ह्या सर्वांचें विवेचन मागें कलम २१ पासून २९ पर्यंत विस्तृत रीतीनें केलें आहे.



३८. वरील कोष्टकांत सरते शेवटीं 'स्वसंमत' असें निराळें सदर घालून त्या-
च्या खालीं १६ स्वर दिले आहेत त्यांविषयीं विशेष खुलासा केला पाहिजे. सध्या
प्रचारांत असलेल्या १२ स्वरांनीं निरनिराळ्या रागांचें स्वरूप शुद्ध स्पष्ट व पूर्ण दा-
खवितां येत नाहीं, व तेवढ्या स्वरांत नानातऱ्हेच्या गमण्यांचा संग्रह चांगलासा क-
रितां येत नाहीं असा बऱ्याच कलानिपुण संगीतशास्त्रज्ञांचा अनुभव आहे. हिंदुस्थानांत
विशेष प्रसिद्धीस आलेले कांहीं हिंदु व मुसलमान गवई व तंतकार आपलें संगीतक-
लेचें चातुर्य दाखविण्याकरितां प्रसंगविशेषीं १२ पेक्षां अधिक स्वरांचा प्रयोग मार्मिक
रीतीनें करून दाखवितात. व त्या स्वरांस ते अतकोमल तरतीव्र अशीं नांवें देतात
असा सार्वत्रिक प्रवाद आहे. ह्याला प्रत्यंतर पाहिजे असल्यास तें देश रागांतील
जो प्रसिद्ध व सर्वतोमुखीं असलेला चतुरंग आहे त्यांत सांपडतें. ह्या चतुरंगांत अतकोमल
व तरतीवर ह्मणजे अतिकोमल व तीव्रतर ह्या अधिक दोन तऱ्हेच्या विकृत स्वरांचा स्पष्ट
उल्लेख आहे. तेव्हां शास्त्र व रूढि किंवा प्रचार ह्यांचा मेळ घालण्याचें बिकट व नाजुक
काम करणाऱ्यांस ह्या अधिक दोन तऱ्हेचे विकृत स्वर जमेस धरले पाहिजेत. ह्याहीपेक्षां
जास्त स्वर लक्ष्यांमध्यें येत असतील तर त्यांचाही विचार आपल्यास केला पाहिजे. पण
सध्यां प्रचारांत ह्यापेक्षां अधिक स्वर उपलब्ध होत नाहींत.

३९. आतां अतिकोमल व तीव्रतर ह्या संज्ञा सशास्त्र रीतीनें कोणच्या
स्वरांस लावतां येतात व त्यांसह एकंदर किती स्वर निष्पन्न होतात हें फार
मार्मिकतेनें निश्चित केलें पाहिजे. षड्ज व पंचम हे दोन स्वर अर्वाचीन शा-
स्त्रकारांनीं अविकृत मानिले आहेत, तसे सध्याच्या प्रचारांत देखील अविकृतच स-
मजतात. मध्यम दोन आहेतः—(१) कोमल मध्यम व (२) तीव्र मध्यम. प्रचा-
रांतील कोमल मध्यम हाच शास्त्रांतील शुद्ध मध्यम होय, व कर्णाटकांत ह्याला शुद्ध
मध्यम असेंच म्हणतात. तीव्र मध्यमास कर्णाटकांत प्रतिमध्यम अशी संज्ञा आहे. ही
संज्ञा शास्त्रांत कोठेंही दृग्गोचर होत नाहीं. ही त्यांची संज्ञा कल्पित दिसते. सोळाव्या
श्रुतीवर अभिव्यक्त होणारा एक तीव्रतम मध्यम आहे, त्याला मृदु पंचम असें शास्त्रांत
कोठें कोठें म्हटलें आहे. पण तो प्रचारांत नसल्यामुळें व तो मध्यमग्रामांतील पंचम होत
असल्यामुळें व मध्यमग्राम प्रचारांत फारसा येत नसल्याकारणानें तो आपल्यास सध्यां
मानण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. एथपर्यंत षड्ज, पंचम व २ मध्यम असे ४ स्वर झाले.
आतां ऋषभ व धैवत आणि गांधार व निषाद हे चार स्वर राहिले. शुद्ध ऋषभ व शुद्ध
धैवत आपल्या इकडे प्रचारांत नाहींत. ते कर्णाटकांत उपलब्ध होतात. ह्या स्वरांचे

---

१. (अ० ) चतरंगको गावो रससोंगतसो, और तीवर कोमल देत बतल
तरतीवरको अतकोमल सुरको न्यारो न्यारो सुरसोंगतसो ॥ ध्रु० ॥

(अ० ) उनंचास कूटतान तिनके कठन रंगेले अम्र ब्यवरे
मम पप निनि संसं ननिधपमगरि
धाकडतक धुंकडतक धुंकट [illegible] धित्ता धित्ता
धित्ताकडतक धुंकडाकडतक गादिगन था ॥ १ ॥

कोमल व तीव्र असे दोनदोन भेद प्रचारांत आहेत. व ते पारिजातकारास संमत आ- हेत. तसेंच कोठें कोठें समयविशेषीं अनुभवास येत असलेले अतिकोमल ऋषभ व अति- कोमल धैवत हेही दोन स्वर पारिजातकारानें पूर्वऋषभ व पूर्वधैवत ह्या संज्ञांनीं नि- र्दिष्ट केले आहेत. प्रचारांतील कोमल गांधार व कोमल निषाद हेच शास्त्रांतील शुद्ध गांधार व शुद्ध निषाद होत. दहाव्या व अकराव्या श्रुतीवर अभिव्यक्त होणारे साधारण गांधार व अंतर गांधार असे दोन शुद्धाच्या पुढचे गांधार शास्त्रांत मानिले आहेत तेच आपले तीव्र व तीव्रतर गांधार होत. त्याचप्रमाणें तेविसाव्या व चोविसाव्या किंवा पहिल्या व दुसऱ्या श्रुतींवर अभिव्यक्त होणारे कैशिकी निषाद व काकली निषाद जे सर्व शास्त्रकारांनीं दिले आहेत तेच आपले प्रचारांतील तीव्र निषाद व तीव्रतर निषाद असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. कोमल गांधाराच्याही मागच्या श्रुतीवर जावें तर तेथें तीव्र ऋषभ लागतो, तेव्हां गांधाराच्या बाबतींत अतिकोमल गांधार संभवतच नाहीं. त्याचप्रमाणें तीव्र ऋषभाच्या पुढची श्रुति शुद्ध गांधाराची आहे ह्मणून तीव्रतर ऋषभही संभवत नाहीं हेंही स्पष्ट आहे. ह्याच न्यायानें अतिकोमल निषाद व तीव्रतर धैवत हेही संभवत नाहींत हें उघड आहे.

४०. एवंच, ऋषभ, गांधार, धैवत व निषाद ह्या चार स्वरांचे प्रत्येकीं तीन तीन भेद, मिळून १२ स्वर, व पूर्वींचे ४, ह्मणजे २ मध्यम आणि षड्ज व पंचम, मिळून एकंदर १६ स्वर शास्त्र व प्रचार ह्या दोहोंस अनुसरून आपल्यास आजच्या स्थितींत निश्चित करितां येतात. ह्यांतच कर्णाटकांतील गाण्याचाही संग्रह करावयाचा ह्मटल्यास वर निर्दिष्ट केलेले शुद्ध ऋषभ व शुद्ध धैवत हे दोन स्वर जास्त मानावे लागतात, ह्मणजे एकं- दर १८ स्वर होतात. हे दोन स्वर वरील कोष्टकांत 'स्वसंमत' ह्या सदराखालीं कंसांत दाखविले आहेत. रागविबोध व संगीतपारिजात ह्या ग्रंथांत ह्याही पेक्षां जास्त विकृत स्वर दिले आहेत, परंतु संगीत कलेच्या सध्याच्या स्थितींत आपल्यास इतकेच विकृत स्वर मानणें योग्य व श्रेयस्कर आहे. वरील विवेचनांत अर्वाचीन ग्रंथकारां- प्रमाणें आपणही सापेक्ष विकृत स्वर मानिले नाहींत हें निराळें सांगण्याची कांहीं ज- रूर नाहीं.

## जाति व गीति.

### जाति.

४१. ज्या विशिष्ट स्वररचनेपासून राग उत्पन्न होतात त्या स्वररचनेला जाति असें ह्मणतात.

४२. सात स्वरांच्या रचनेस संपूर्ण, सहा स्वरांच्या रचनेस षाडव व पांच स्व- रांच्या रचनेस औडव अशा संज्ञा आहेत.

४३. गाण्यांत ज्या स्वराचा उच्चार वारंवार होतो त्यास अंशस्वर असें ह्मणतात.

४४. गीताचा प्रारंभ ज्या स्वरापासून होतो त्यास ग्रहस्वर अशी संज्ञा आहे.

४५. गीताची समाप्ति ज्या स्वरानें होते त्यास न्यासस्वर असें ह्मणतात.



४६. गीताच्या एखाद्या भागाची समाप्ति करणारा स्वर तो अपन्यासस्वर होय.

४७. जाति दोन प्रकारच्या आहेतः—१ शुद्ध, २ विकृत.

४८. सप्तस्वरांच्या नांवावरून झालेल्या जाति शुद्ध मानिल्या आहेत:—षाड्जी, आर्षभी, गांधारी, मध्यमा, पंचमी, धैवती व नैषादी ह्या सात शुद्ध जाति होत.

४९. ज्यांच्या नांवाचा स्वर हाच न्यासस्वर असतो व तोच अंशस्वर, ग्रहस्वर व अपन्यासस्वरही समयविशेषीं होऊं शकतो व ज्यांचा न्यासस्वर तारस्थानामध्यें कधींही जात नाहीं त्या जाति शुद्ध होत.

५०. ज्यांच्या नांवाचा स्वर केवळ न्यासस्वर असतो व अंशस्वर ग्रहस्वर इत्या- दिकांविषयीं कांहीं नियम नसतो त्या जाति विकृत होत.

५१. ह्याप्रमाणें षाड्जीचे संपूर्ण १५ भेद व षाडव आणि औडव ८, मिळून २३ विकृत भेद संभवतात. हे इतके विकृत भेद प्रत्येक शुद्ध जातीचे होतात.

५२. शुद्ध जातींच्या मिश्रणानें झालेल्या मुख्य विकृत जाति ११ आहेत. त्यांचीं नांवें व मिश्रणाचा प्रकार एणेंप्रमाणें.—

| | | | |
|---|---|---|---|
| १. | षड्जकैशिकी | ( सं ) | = षाड्जी + गांधारी. |
| २. | षड्जमध्यमा | | = षाड्जी + मध्यमा. |
| ३. | गांधारपंचमी | ( सं ) | = गांधारी + पंचमी. |
| ४. | आंध्री | (सं. षा.) | = गांधारी + आर्षभी. |
| ५. | षड्जोदीच्यवा | | = षाड्जी + गांधारी + धैवती. |
| ६. | कर्मारवी | ( सं ) | = नैषादी + पंचमी + आर्षभी. |
| ७. | नंदयंती | (सं. षा.) | = गांधारी + पंचमी + आर्षभी. |
| ८. | गांधारोदीच्यवा | (सं.षा.) | = गांधारी + धैवती + षाड्जी + मध्यमा. |
| ९. | मध्यमोदीच्यवा | ( सं ) | = गांधारी + धैवती + पंचमी + मध्यमा. |
| १०. | रक्तगांधारी | | = गांधारी + नैषादी + पंचमी + मध्यमा. |
| ११. | कैशिकी | | = षाड्जी + गांधारी + मध्यमा + पंचमी + नैषादी. |

५३. ह्या ११ विकृत जाति व पूर्वींच्या ७ शुद्ध मिळून १८ जाति मुख्य आहेत. त्यांपैकीं षड्ज स्वराच्या नांवाच्या चार व आर्षभी, धैवती आणि नैषादी ह्या तीन मि- ळून सात जाति षड्ज ग्रामाच्या होत. बाकीच्या ११ जाति मध्यम ग्रामाच्या आहेत.

५४. ह्या १८ जातींपैकीं, कार्मारवी, गांधारपंचमी, षड्जकैशिकी, व मध्यमोदी- च्यवा ह्या ४ नित्य संपूर्ण असतात; षाड्जी, नंदयंती, आंध्री व गांधारोदीच्यवा ह्या ४ संपूर्ण-षाडव असूं शकतात; व बाकीच्या १० संपूर्ण, षाडव व औडवही होऊं शकतात.

५५. अमुक एक प्रकारच्या स्वररचनेचें गाणें कीं ज्यामध्यें न्यासस्वर अमुक एक निश्चित असावा, अंश, ग्रह, इत्यादि स्वर अमुक असावेत, अमुक ताल, अमुक कला व अमुक मार्ग असावा, व अमुक रस अभिव्यक्त व्हावा अशा प्रकारच्या नियमबद्ध

स्वररचनेच्या गाण्यास शास्त्रकार जाति असें नांव देतात. उदाहरणार्थ–षाड्जी जाति. ह्या जातीमध्यें सात स्वर असावेत ह्मणजे ती संपूर्ण असावी, षाडव केल्यास निषादाचा लोप करावा, षड्ज हा न्यासस्वर असावा, निषाद व ऋषभ वर्ज्य करून बाकीचे पांच स्वर अंशस्वर असावे, तीन प्रकारचा षट्पितापुत्रक ताल असावा, धैवतादि ह्मणजे उत्तरायता मूर्छना असावी, चित्र, वृत्ति (वार्तिक) व दक्षिण हे मार्ग असावेत, मागधी, संभाविता व पृथुला ह्या गीति असाव्या वगैरे नियम आहेत. ह्या जातीपासून श्रीराग इत्यादि राग उत्पन्न होतात. ह्या जातीस छंदःशास्त्राचे नियम फारसे लागत नाहींत. जाति ह्या मार्गसंगीतांतच प्रसिद्ध आहेत.

५६. जातींचें गाणें हें जुन्या प्रबंधांसारखें असतें. हें जातींचें गाणें सामवेदापासून उत्पन्न झालेलें आहे, ह्मणून ह्या जाति वेदतुल्य मानिल्या आहेत. ह्यांच्या मधील पदें, स्वर, ताल, कला, मार्ग हे सर्व नियमांनीं अगदीं बांधिलेले असतात. ते बिलकूल बदलून गातां कामा नये. त्यांत बदल करून गाइल्यास प्रत्यवाय सांगितला आहे. जातींचें गाणें मार्गसंगीतास विशेष धरून असल्या कारणानें त्याचा विस्तार एथें फारसा केला नाहीं.

५७. षाड्जी इत्यादि सात शुद्ध जातींपासून उत्पन्न होणाऱ्या रागांचें प्रतिबिंब किंवा स्वरूप जातींच्या ज्या खंडामध्यें दिसून येतें त्यास **कपाल** अशी अन्वर्थक संज्ञा आहे. सात शुद्ध जातींचीं सात कपालें मानिलीं आहेत.

५८. ज्या गाण्यामध्यें पंचम स्वर ग्रह, अंश व अपन्यास असून षड्ज न्यास असतो, व ऋषभ फार असून, मध्यम, धैवत व गांधार अल्प असतात त्यास **कंबल** असें ह्मणतात. हें गाणें कंबल ह्या नांवाच्या संगीतशास्त्रविशारद फणींद्रानें प्रथम सुरू केलें, ह्मणून त्याच्याच नांवानें तें प्रसिद्ध आहे. कपाल व कंबल ह्यांचा उपयोग मार्गसंगीतांतच आढळतो.

## गीति.

५९. स्थायी आदिकरून वर्ण व प्रसन्नादि अलंकार, पदें, द्रुत मध्य किंवा विलंबित लय, ह्यांनीं युक्त अशी जी गायनाची क्रिया तिला **गीति** असें ह्मणतात.

६०. गीति चार प्रकारच्या आहेतः--१ मागधी, २ अर्धमागधी, ३ संभाविता व ४ पृथुला.

६१. ज्या गीतीचीं पहिल्या कलेंतील पदें विलंबित लयांत, दुसऱ्या कलेंतील पदें मध्य लयांत व तिसऱ्या कलेंतील पदें द्रुत लयांत गातात तिला **मागधी गीति** असें म्हणतात.

६२. ज्या गीतीच्या मागच्या मागच्या कलेंतील पदांचें अर्ध पुढच्या पुढच्या कलेंत द्विवार उच्चारतात तिला अर्धमागधी म्हणावें.



६३. ज्या गीतींतील पदें संक्षिप्त असून बहुतेक अक्षरें गुरु असतात तिला संभाविता अशी संज्ञा आहे.

६४. ज्या गीतींतील पदें बहुतेक लघु अक्षराचीं असतात तीस पृथुला गीति असें ह्मणतात.

ह्या गीतींमध्यें तालांचाही निर्बंध असतो, परंतु त्याचा विचार एथें केला नाहीं.

## मेळ व राग.

### मेळ.

६५. ज्या विशिष्ट रचनेच्या स्वरसमूहामध्यें राग अभिव्यक्त करण्याची शक्ति असते व ज्याच्या योगानें रागांचा मेळ घालतां येतो ह्मणजे रागांचें वर्गीकरण करितां येतें त्या विशिष्ट स्वरसमूहास मेळ असें ह्मणतात.

६६. जाति व मेळ ह्यांच्या मधील भेद फार सूक्ष्म आहे. जाति ह्मणजे एक प्रकारचें सर्वांगसंपूर्ण असें प्राचीन गाणें आहे व त्यापासून रागांची उत्पत्ति मानिली आहे. मेळ हे रागांचे सामान्य स्वरूपात्मक असतात व ह्मणून ते पृथक् गाइले जात नाहींत. त्यांचें व रागांचें स्वरूप जेव्हां एकच असतें त्या वेळेस राग या नात्यानें ते गाइले जातात. जाति ह्या मार्गसंगीतास उपयोगीं पडणाऱ्या आहेत व त्या प्राचीन ग्रंथांतच सांपडतात. मेळ हे देशी संगीतांत ह्मणजे विशेषेंकरून कर्णाटकी गायनांत दृष्टोत्पत्तीस येतात. त्यांच्याविषयींचा विचार अर्वाचीन ग्रंथकारांनींच केला आहे.

६७. मेळ हे स्वररचनात्मक असल्याकारणानें त्यांची संख्या स्वरांच्या संख्येवर अवलंबून राहते. जसजशी विकृत स्वरांची संख्या अधिक मानिली असेल तसतसे मेळही अधिक अधिक होतात. संगीत-पारिजातकार ७ शुद्ध स्वर व २२ विकृत स्वर मिळून २९ स्वर मानितात असें पूर्वी सांगितलें आहे. ह्या २९ स्वरांच्या स्वरप्रस्ताराच्या पद्धतीनें ७, ६ व ५ स्वरांच्या ह्मणजे संपूर्ण षाडव व औडव तऱ्हेच्या रचना केल्यास त्या क्रमानें २६६४, ५१७५, व ३५०१ होतात, ह्मणजे एकंदर ११३४० रचना संभवतात. एवंच पारिजातकाराच्या मतीं एकंदर मेळ ११३४० आहेत. ह्यापैकीं २२ शुद्ध, २७२ एक स्वर विकृत असलेले, १२८६ दोन स्वर विकृत असलेले, ३६०० तीन स्वर विकृत असलेले, ४२४० चार स्वर विकृत असलेले, व १९२० पांच स्वर विकृत असलेले आहेत. रागविबोधकार ७ शुद्ध व १५ विकृत स्वर मानितात. त्यांच्या मतीं ह्या २२ स्वरांच्या रचना ह्मणजे मेळ ९६० आहेत. कर्णाटकांत ७ शुद्ध व ९ विकृत स्वर मिळून १६ स्वर मानितात. ह्या १६ स्वरांवरून झालेले सध्यां कर्णाटकांत प्रसिद्ध असलेले मेळ ७२ आहेत.

६८. रागविबोधकारानें ९६० मेळांपैकीं २३ मुख्य मेळ लक्षणांसह व त्यांत मेळ पावणाऱ्या रागांसह दिले आहेत, ते खालील कोष्टकांत दाखविले आहेत.

## रागांवरून नांव पावणारे मुख्य २३ मेळ.

| क्रम. | मेळ्याचें नांव. | मेळाची क्रमसंख्या | किती स्वर विकृत. | स्वर. | | | | | | | मेळांत अंतर्भूत होणारे राग. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मुखारी | १ | सर्व शुद्ध | स | रि | ग | म | प | ध | नि | मुखारी, हुसेनीतोडी इ० |
| २ | रेवगुप्ति | ५ | १ वि० | स | रि | अं. ग | म | प | ध | नि | रेवगुप्ति इ०. |
| ३ | सामवराली | १४ | ,, | स | रि | ग | म | प | ध | का. नि | सामवराली, वसंतराडी इ०. |
| ४ | तोडी ... | ४२ | २ वि० | स | रि | सा. ग | म | प | ध | कै. नि | तोडी, हुसेनीतोडी इ०. |
| ५ | नादरामक्री | ४४ | ,, | स | रि | सा. ग | म | प | ध | मृ. स | नादरामकी इ०. |
| ६ | भैरव ... | ५० | ,, | स | रि | अं. ग | म | प | ध | कै. नि | भैरव, पौरविका इ०. |
| ७ | वसंत ... | ५१ | ,, | स | रि | अं. ग | म | प | ध | का. नि | वसंत, टक, हिजेज, हिंदोल इ०. |
| ८ | वसंतभैरवी | ५८ | ,, | स | रि | मृ. म | म | प | ध | कै. नि | वसंतभैरवी, मारवी इ० |
| ९ | मालवगौड | ६० | ,, | स | रि | मृ. म | म | प | ध | मृ. स | मालवगौड, शुद्धगौडी, चैत्तीगौडी, पूर्वी, पहाडी, देवगांधार, गौंडकिया, कुरंजी, बहुली; रामकिया, पावक, आसावरी, पंचम, बंगाल, शुद्धललिता, गुर्जरी, परज, विशुद्धगौड इ०. |
| १० | रीतिगौड | ८४ | ,, | स | रि | ग | म | प | ती.तर ध शु. नि. | कै. नि | रीतिगौड इ०. |
| ११ | आभीरनाट | ६१ | ३ वि० | स | ती.तर रि | सा. ग | म | प | ध | मृ. स | आभीरनाट इ०. |
| १२ | हम्मीर ... | ७७ | ,, | स | ती.तर रि | मृ. म | म | प | ध | मृ. स | हम्मीर, विहंगड, केदार इ०. |
| १३ | शुद्धवराटी | १६५ | ,, | स | रि | सा. ग | ती.तम म | प | ध | मृ. स | वराटी. |
| १४ | रामक्री ... (देशकार) | २०७ | ,, | स | रि | मृ. म | ती.तम म | प | ध | मृ. स | ललित, जैताश्री, त्रावणी, देशी, ललित (विभासभेद.) |
| १५ | श्रीराग... | ९३ | ४ वि० | स | ती. रि | सा. ग | म | प | तीव्र ध | कै. नि | श्रीराग, मालवश्री, धन्याशी, भैरवी, धवलाधनाश्री, भवाळी, सैंधवी(सिंधोडा) इ०. |
| १६ | कल्याण | १०४ | ,, | स | ती.तर रि | सा. ग | मृ. प | प | ध | मृ. स | कल्याण इ०. |
| १७ | कांबोदी | १४० | ,, | स | ती.तर रि | अं. ग | म | प | ती.तर ध | का. नि | कांबोद, देवकी इ०. |



## रागांवरून नांव पावणारे मुख्य २३ मेळ.

(पुढें चालू).

| क्रम. | मेळ्याचें नांव. | मेळाची क्रमसंख्या | किती स्वर विकृत. | स्वर. | | | | | | | मेळांत अंतर्भूत होणारे राग. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १८ | मल्लारि | १६२ | ४ वि० | स | ती.तर रि | मृ. म | म | प | ती.तर ध | मृ. स | मल्लारि, नटमल्लारि, पूर्वगौड, भूपाळी, गौंड, शंकराभरण, नटनारायण, नारायणगौड, केदार (दुसरा), सालंकनाट, वेलावली, मध्यमादि, सावेरी, सौराष्ट्री इ०. |
| १९ | सौमंत | २४५ | ,, | स | ती.तम रि | अं. ग | म | प | ती.तम ध | का. नि | सामंत इ०. |
| २० | कर्णाटगौड | २५९ | ,, | स | ,, | मृ. म | म | प | ती. ध | कै. नि | कर्णाटगौड, अड्डाणा, नागध्वनि, विशुद्धबंगाल, वर्णनाट, तुरुष्कतोडी इ०. |
| २१ | देशाक्षी | २६४ | ,, | स | ,, | ,, | म | प | ती.तर ध | मृ. स | देशाक्षी इ०. |
| २२ | शुद्धनाटी | २६७ | ,, | स | ,, | ,, | म. | प | ती.तम ध | ,, | शुद्धनाट इ०. |
| २३ | सारंग | १४४ | ५ वि० | स | ती.तर रि. | ती.तम ग | मृ. प | प | ती.तम ध | ,, | सारंग इ०. |

६९. कर्णाटकांत मुख्य मेळ ७२ मानितात. त्यांचे त्यांनीं ३६, ३६ चे दोन विभाग केले आहेत, व ते शुद्धमध्यम व प्रतिमध्यम ह्यांवर अवलंबून आहेत. ह्यांपैकीं प्रत्येक ३६ च्या विभागाचीं सहा सहांचें एक अशीं ६ चक्रें कल्पिलीं आहेत, व तीं रि ग ध नि ह्या चार स्वरांच्या प्रत्येकीं ३, ३ अशा १२ विकृत भेदांवर क्रमानें व व्यवस्थेनें बसविलीं आहेत. हीं ७२ मेळांचीं ६, ६ चीं १२ चक्रें व त्यांचीं स्वररचना व संज्ञा खालीं दिलीं आहेत. हे सर्व मेळ संपूर्ण आहेत.

## कर्णाटकी मेळांचें कोष्टक.

| चक्र. | क्रमसंख्या | शुद्धमध्यम-मूलक. मेळ. | स्वरस्थान. रि | ग | ध | नि | प्रतिमध्यम-मूलक. मेळ. | क्रमसंख्या | चक्र. |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | १ | कनकांगी | शु. | शु. | शु. | शु. | सालग | ३७ | |
| | २ | रत्नांगी | ,, | ,, | शु. | कै. | जलार्णव | ३८ | |
| | ३ | गानमूर्ति | ,, | ,, | शु. | का. | झालवराळी. | ३९ | |
| १ लें. | ४ | वनस्पति | ,, | ,, | च. | कै. | नवनीत | ४० | ७ वें. |
| | ५ | मानवती | ,, | ,, | च. | का. | पावनी | ४१ | |
| | ६ | तानरूपिणी | ,, | ,, | ष. | का. | रघुप्रिय. | ४२ | |
| | ७ | सेनापति | शु. | सा. | शु. | शु. | गवांभोधि | ४३ | |
| | ८ | हनुमत्तोडी | ,, | ,, | शु. | कै. | भवप्रिय | ४४ | |
| | ९ | धेनुक | ,, | ,, | शु. | का. | शुभपंतुवराळी | ४५ | |
| २ रें. | १० | नाटकप्रिय | ,, | ,, | च. | कै. | षड्विधमार्गिणी | ४६ | ८ वें. |
| | ११ | कोकिलप्रिय | ,, | ,, | च. | का. | सुवर्णांगी | ४७ | |
| | १२ | रूपवती | ,, | ,, | ष. | का. | दिव्यमणि | ४८ | |
| | १३ | गायकप्रिय | शु. | अं. | शु. | शु. | धवलांबरी | ४९ | |
| | १४ | वकुलाभरण | ,, | ,, | शु. | कै. | नामनारायणी | ५० | |
| | १५ | **मायामालवगौळ** | ,, | ,, | शु. | का. | कामवर्धनी | ५१ | |
| ३ रें. | १६ | चक्रवाक | ,, | ,, | च. | कै. | रामप्रिय | ५२ | ९ वें. |
| | १७ | सूर्यकांत | ,, | ,, | च. | का. | गमनश्रम | ५३ | |
| | १८ | हाटकांबरी | ,, | ,, | ष. | का. | विश्वंभरी | ५४ | |
| | १९ | झंकारध्वनि | च. | सा. | शु. | शु. | श्यामलांगी | ५५ | |
| | २० | **नठभैरवी** | ,, | ,, | शु. | कै. | षण्मुखप्रिय | ५६ | |
| | २१ | **कीरवाणी** | ,, | ,, | शु. | का. | सिंहेंद्रमध्यमा | ५७ | |
| ४ थें. | २२ | खरहरप्रिय | ,, | ,, | च. | कै. | हेमवती | ५८ | १० वें. |
| | २३ | **गौरीमनोहारि** | ,, | ,, | च. | का. | धर्मवती | ५९ | |
| | २४ | वरुणप्रिय | ,, | ,, | ष. | का. | नीतिमती | ६० | |
| | २५ | माररंजनी | च. | अं. | शु. | शु. | कांतामणि | ६१ | |
| | २६ | चारुकेशी | ,, | ,, | शु. | कै. | रिषभप्रिय | ६२ | |
| | २७ | सरसांगी | ,, | ,, | शु. | का. | लतांगी | ६३ | |
| ५ वें. | २८ | हरिकांबोधी | ,, | ,, | च. | कै. | वाचस्पति | ६४ | ११ वें. |
| | २९ | **धीरशंकराभरण** | ,, | ,, | च. | का. | मेचकल्याणी | ६५ | |
| | ३० | नागानंदिनी | ,, | ,, | ष. | का. | चित्रांबरी | ६६ | |
| | ३१ | यागप्रिय | ष. | अं. | शु. | शु. | सुचरित्र | ६७ | |
| | ३२ | रागवर्धनी | ,, | ,, | शु. | कै. | ज्योतिष्मती | ६८ | |
| | ३३ | गांगेयभूषणी | ,, | ,, | शु. | का. | धातुवर्धनी | ६९ | |
| ६ वें. | ३४ | वागधीश्वरी | ,, | ,, | च. | कै. | नासिकाभूषणी | ७० | १२ वें. |
| | ३५ | शूलिनी | ,, | ,, | च. | का. | कोसल | ७१ | |
| | ३६ | चलनाट | ,, | ,, | ष. | का. | रसिकप्रिय | ७२ | |



७०. ह्यांपैकीं १५ वा मेळ **मायामालवगौळ** हा कर्णाटकांत फार प्रसिद्ध व लोकप्रिय आहे. २९ वा मेळ **धीरशंकराभरण** हा पाश्चात्यांच्या मेजर मोडप्रमाणें आहे, व २० वा **नटभैरवी**, २१ वा **कीरवाणी** व २३ वा **गौरीमनोहारि** हे सर्व मेळ पाश्चात्यांच्या मायनर मोडचे प्रकार होत.

७१. ह्या ७२ मेळांच्या संज्ञा व स्वररचना मोठ्या कल्पकतेनें योजिल्या आहेत. मेळाचें नांव उच्चारल्याबरोबर तो ७२ मेळांपैकीं क्रमानें कितवा येतो हें त्याच्या नांवाच्या पहिल्या दोन अक्षरांवरून तेव्हांच कळून येतें. त्याचा क्रम समजला ह्मणजे तो १२ चक्रांपैकीं कितव्या चक्रांत येतो हें निश्चित होतें व तें झालें ह्मणजे त्याची स्वररचनाही समजते.

७२. अक्षरांवरून संख्या समजण्याकरितां मेळांमध्यें संस्कृत ग्रंथांत प्रसिद्ध असलेल्या **कटपयमानाची** योजना केली आहे. कटपयमान असें आहे:—वर्णमालेंतील अक्षरांपैकीं **क** पासून **झ** पर्यंत ९ अक्षरें व **ट** पासून **ध** पर्यंत ९ अक्षरें क्रमानें १ पासून ९ अंकांबद्दल, तसेंच **प** पासून **म** पर्यंत ५ अक्षरें क्रमानें पहिल्या ५ अंकांबद्दल, व **य** पासून **ह** पर्यंत ८ अक्षरें क्रमानें पहिल्या ८ अंकांबद्दल योजावीं. **ञ** व **न** हीं दोन अक्षरें शून्याकारितां योजितात. ह्या अक्षरयोजनेच्या मानानें संख्यां तयार करावयाची असल्यास ‘ अंकानां वामतो गतिः ’ ह्या न्यायानें उजवीकडून डावीकडे अंक मांडावे असा नियम आहे. तसे अंक मांडिले ह्मणजे संख्या तयार होते. उदाहरणार्थ—‘ राम ’ ह्या शब्दावरून कोणती संख्या तयार होते हें पाहूं. **र** ह्मणजे २, व **म** ह्मणजे ५; व ‘ अंकानां वामतो गतिः ’ ह्या नियमाप्रमाणें प्रथम २ मांडून त्याच्या डावीकडे ह्मणजे पाठीमागें ५ मांडले ह्मणजे ५२ ही संख्या तयार झाली. तसेंच ‘ नाग ’ ह्या शब्दावरून शून्य व तीन हे अंक येतात व ते नियमाप्रमाणें मांडले ह्मणजे ३० ही संख्या तयार होते. ह्याचप्रमाणें १५ ह्या संख्येबद्दल ‘ माया ’ हा शब्द व २२ ह्या संख्येबद्दल ‘ खर ’ हा शब्द योजितां येतो.

७३. मेळांच्या चक्रांची व्यवस्था कोणत्या तत्त्वावर बसविली आहे, हें पूर्णपणें लक्षांत घेतलें ह्मणजे इच्छित मेळाची स्वररचनाही तेव्हांच समजते. ७२ मेळांचीं ६, ६ चें एक अशीं १२ चक्रें आहेत. पहिल्या ६ चक्रांत ह्मणजे ३६ व्या मेळापर्यंत मध्यमशुद्ध आहे. ३७ पासून ७२ व्या मेळापर्यंत प्रतिमध्यम ह्मणजे तीव्रमध्यम आहे. षड्ज व पंचम सर्वत्र शुद्ध आहेत. बाकी राहिलेले स्वर **रि ग ध नि** हे होत. ह्या चार स्वरांपैकीं **ध** हा प्रत्येक चक्रांत पहिल्या तीन मेळांत शुद्ध, पुढच्या दोन मेळांत चतुःश्रुति, व सहाव्या मेळांत षट्श्रुति असा ठेविला आहे; व **नि** हा पहिल्या मेळांत शुद्ध, दुसऱ्या व चवथ्या मेळांत कैशिकी व तिसऱ्या, पांचव्या व सहाव्या मेळांत काकली ठेविला आहे. हीच व्यवस्था प्रत्येक चक्रांत आहे. **रि** हा पहिल्या तीन चक्रांत शुद्ध.

---

१. कादयो ङ्काष्टादयो ङ्काः पायाः पञ्च प्रकीर्तिताः ॥
यादयोऽष्टौमताः प्राज्ञैर्गणकैर्बुद्धिमत्तरैः ॥ १ ॥

आहे, चवथ्या व पांचव्या चक्रांत चतुःश्रुति, व सहाव्या चक्रांत षट्श्रुति ठेविला आहे.
ग हा पहिल्या चक्रांत शुद्ध, दुसऱ्या व चवथ्या चक्रांत साधारण, आणि तिसऱ्या,
पांचव्या व सहाव्या चक्रांत अंतर ठेविला आहे. मध्यम खेरीज करून बाकीच्या स्व-
रांसंबंधीं पहिल्या ६ चक्रांत जी व्यवस्था आहे तीच पुढच्या सहा चक्रांतही ठे-
विली आहे.

७४. तर जे ७२ मेळ दिले आहेत त्यांच्या नांवावरून त्यांचा क्रम व त्यांची
स्वररचना कशी निष्पन्न होते तें पाहूं. उदाहरणार्थ—**कन**कांगी हा मेळ घेऊं. ह्यां-
तील पहिलीं दोन अक्षरें क न हीं आहेत. कटपयमानाप्रमाणें 'क' ह्मणजे १ व
'न' ह्मणजे शून्य. यांची नियमाप्रमाणें संख्या तयार केली तर ती ०१ अशी
ह्मणजे १ होते. ह्यावरून **कन**कांगी हा मेळ पहिला होय, व ह्याची स्वररचना वरील
नियमाप्रमाणें—**स** ( शु. ), **रि** ( शु. ), **ग** ( शु. ), **म** ( शु. ), **प** ( शु. ), **ध**
( शु. ), **नि** ( शु. ) अशी निष्पन्न होते. **मायामालवगौळ**, हा मेळ, ५ व १ ह्या
अंकांचा ह्मणजे १५ वा होय. हा तिसऱ्या चक्रांतील तिसरा मेळ आहे. तेव्हां ह्याची
स्वररचना वरील नियमाप्रमाणें **स** ( शु. ), **रि** ( शु. ), **ग** ( अं. ), **म** ( शु. ),
**प** ( शु. ), **ध** ( शु. ), **नि** ( का. ) अशी निष्पन्न होते. **खरहराप्रिय** हा मेळ २२
वा होय, व तो चवथ्या चक्रांतील चवथा मेळ होत असल्या कारणानें त्याची स्वरर-
चना **स** ( शु. ), **रि** ( च. ), **ग** ( सा. ), **म** ( शु. ), **प** ( शु. ), **ध** ( च ),
**नि** ( कै. ) अशी आहे. त्याचप्रमाणें **मेचकल्याणी** हा मेळ ६ व ५ ह्या अंकांचा
ह्मणजे ६५ वा होय. तो ११ व्या चक्रांतील पांचवा मेळ पडत असल्या कारणानें
तो प्रतिमध्यमाच्या चक्रांतील मेळ आहे, व त्याची स्वररचना **स** ( शु ), **रि** ( च. ),
**ग** ( अं. ), **म** ( प्र. ), **प** ( शु. ), **ध** ( च. ), **नि** ( का. ) अशी निष्पन्न होते. ह्या नि-
यमांवरूनच अमुक एक प्रकारची मेळाची स्वररचना दिली तर तो कोणत्या चक्रांतील
कितवा मेळ होईल व त्याचें नांव काय हेंही काढितां येईल.

## राग.

७५. स्वर, वर्ण, अलंकार, मूर्छना, तान, गमक इत्यादिकांनीं भूषित व वादी, सं-
वादी, अनुवादी व विवादी, तसेंच ग्रह, अंश व न्यास ह्या स्वरांची योग्य स्थळीं यो-
जना करून तयार केलेल्या गायनक्रियेनें युक्त व जनांच्या चित्तांचें रंजन करणारा जो
ध्वनिविशेष त्याला **राग** असें ह्मणतात. ही संज्ञा योगरूढ आहे.

७६. ज्या स्वररचनेमध्यें ग्रह, अंश, न्यास स्वर व मंद्र, मध्य, तार आणि वर्ज्या-
वर्ज्यस्वर, फार व थोडे येणारे स्वर यांचा उच्चार स्पष्टपणें अभिव्यक्त होतो त्या स्व-
रांच्या मांडणीस व उच्चारास **आलाप** असें ह्मणतात.

७७. ज्या लहानशा स्वररचनेनें रागाचें केवळ स्वरूप प्रकट करून दाखवितां येतें
त्या स्वराच्या मांडणीस व उच्चारास **आलप्ति** असें ह्मणतात.

७८. गीताच्या प्रत्येक भागाच्या शेवटीं थांबून थांबून रागाचें स्वरूप पृथक्-



पृथक् दाखविणारी आलापासारखीच जी स्वरांची खंडशः मांडणी तीस **रूपक**
असें म्हणतात. रूपकामध्यें आलापासारखीच स्वरांची मांडणी असते, पण आलाप
अगदीं गीताच्या शेवटपर्यंत न थांबतां एकरूपानें दाखविला जातो, व रूपक थांबून
थांबून उच्चारलें जातें. रूपकाचा उपयोग भाषा, विभाषा व अंतरभाषा ह्यांच्या ठि-
काणीं ह्मणजे मार्गरागांतच विशेषें करून होतो.

७९. गीताच्या पदांतील अक्षरांची तालाच्या कलानुरूप मांडणी करून त्यांस
स्वर व ताल लावून दाखविलेली जी रचना तिला **आक्षिप्तिका** असें म्हणतात.

बालसंगीतबोधाच्या प्रत्येक पुस्तकांत पद्यांतील अक्षरांची स्वर व ताल धरून
तालाच्या कलानुरूप जी रचना लिहून दाखविली आहे तीच आक्षिप्तिका होय.

## मार्गराग व देशीराग.

८०. तालांप्रमाणें रागांचेही **मार्गराग** व **देशीराग** असे मुख्य दोन विभाग मा-
निले आहेत.

८१. ज्या रागांमध्यें श्रुति, स्वर, ग्राम, जाति, वर्ण व अलंकार इत्यादिकांचा
फार निर्बंध असतो ते **मार्गराग** होत. ह्मणजे ह्या रागांमध्यें तीव्र कोमल इत्यादि
स्वर ज्या श्रुतींचे सांगितले असतील त्या श्रुति सोडून बिलकुल गातां कामा नये.
तसेंच जे स्वर वर्ज्य सांगितले असतील ते आरोहांत व अवरोहांत कोठेंही घेऊं
नयेत. त्याचप्रमाणें ग्राम, जाति, वर्ण व अलंकार हेही बदलतां येत नाहींत.

८२. ज्या रागांमध्यें श्रुति, स्वर, ग्राम, जाति इत्यादिकांचा फारसा नियम असत
नाहीं ते **देशीराग** होत. ह्मणजे देशी रागांमध्यें अतिकोमल, कोमल, तीव्र व ती-
व्रतर हे स्वर प्रसंगविशेषीं बदलून घेतले तरी हरकत नाहीं. तसेंच वर्ज्य स्वर अ-
वरोहांत लाविले तरी चालतात. ग्राम व जाति ह्यांचा तर नियम देशीरागांमध्यें अ-
गदींच सुटला आहे. सध्या प्रचारांत जे राग आपल्यास ऐकावयास सांपडतात त्यांत
श्रुति, स्वर, जाति इत्यादिकांचा फारसा नियम नसतो हें अनुभवसिद्ध आहे.

८३. संगीतशास्त्रामध्यें अतिशय बिकट, भानगडीचें व मतभेदाचें जर एकादें
प्रकरण असेल तर तें रागांचें होय. रागांचे भेद, वर्गीकरण व संख्या ह्या सर्व बा-
बतींत ग्रंथकारांचा मतभेद फार आहे. आजपर्यंत ह्या शास्त्रावर लिहिणारे जे जे
ग्रंथकार झाले त्यांपैकीं दोघांचीं मतें रागांच्या संबंधानें कांहीं एकसारखीं जुळत
नाहींत. संगीत-रत्नाकरकारानें राग दहा प्रकारचे सांगून त्यांतील प्रसिद्ध रागांची
संख्या २६४ दिली आहे. ह्यांपैकीं मार्गराग १२० व देशीराग १४४ गणिले आ-
हेत. ते प्रकार, त्यांची संख्या व त्या त्या प्रकारांतील सध्यां प्रचारांत दृष्टोत्पत्तीस
येत असलेले राग खालच्या कोष्टकांत दाखविले आहेत.

